# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना.



ईशकृपेनें आज हिंदुधर्मशिक्षण पुस्तक दुसरें जनतेला सा॰ करण्याचा योग येत आहे, ह्याबद्दल संतोष वाटतो; आणि संकल्पि कार्यापैकीं तिसरा हिस्सा काम संपलें म्हणून समाधानही वाटतें पाहिलें पुस्तक प्रसिद्ध झाल्यानतर जे जाहीर व खासगी अभिप्रा आले त्यावरून या पुस्तकाची आवश्यकता सर्वांस वाटत आ॰ असें दिसलें आणि हें कार्य या कमिटीकडून होईल असा विश्वास दाखविण्यात आला. खासगी व प्रसिद्ध अभिप्रायांतील सूचनांचा उपयोग योग्य वेळीं होईल. दुसरें पुस्तक वाचून तज्ज्ञांनीं सूचना कराव्या अशी त्यांना विनंति आहे.

पाठाच्या शेवटीं ज्या पुरवण्या जोडलेल्या आहेत त्या विद्यार्थ्यांची जिज्ञासा वाढविण्याकरितां आहेत. संस्कृत प्राकृत वचनाचा संग्रह हा शिक्षकांना आधारा करितां दिलेला आहे. शिक्षक चांगला मराठी जाणणारा आणि थोडें बहुत संस्कृत जाणणारा असला तरी त्याला पाठ शिकवितांना वचनसंग्रहाचा उपयोग करता येईल सोपीं सोपीं वचनें सामान्य अर्थ सांगून पाठही करून घेतां येतील शिक्षकांनीं तसा प्रयत्न करून पाहावा अशी त्यांना सूचना आहे. सर्व संस्कृत वचनांचें भाषांतर घावें अशाही सूचना आल्या, पण ग्रंथ विस्तार, छपाई खर्च आणि किंमतीचा बोजा याचा विचार करून भाषांतर न देण्याचें ठरविलें. शिवाय भाषांतराची अशी मजा

होते कीं त्यामुळें संस्कृत श्लोक पाठ करून ते लाविण्याची खटपट विद्यार्थी करीत नाहींत.

हिंदुधर्म आणि हिंदुसमाज या दोन भिन्न गोष्टी आहेत. हिंदुसमाजाचे घटक आस्तिकनास्तिक मतवादी असल्यामुळें ते सर्व हिंदुसमाजांत येतात. अशा सर्व घटकांच्या विविध संप्रदायांना हिंदुधर्म असें म्हणतां येईल. पेण आज हिंदुधर्म म्हणजे सनातन वैदिक धर्म असें समजलें जातें. वास्तविक सनातन वैदिकधर्म व हिंदुधर्म यांचा व्याप्यव्यापक संबंध आहे. सनातन वैदिकधर्म हा मुख्यतः त्रैवर्णिकांचा, थोडाबहुत चतुर्थ वर्णाचा आणि फारच थोडा चातुर्वर्ण्यबाह्य जातींचा आहे. देशकालवर्तमान पाहून सनातन वैदिक धर्मांतील जे चांगले आचार आणि जीं चांगलीं तत्वें असतील तीं सर्व हिंदूंनाच नव्हे पण सर्व जगाला दिली पाहिजेत असें कमिटीचें ठाम मत आहे. अमक्यांस अमका अधिकार नाहीं असें म्हणण्याचे दिवस गेले. जो तो मनुष्य आपला अधिकार जाणतो व आपल्याला इष्ट अशा क्षेत्रात हालचाल करीत असतो, असा सर्वसामान्य नियम आहे. कांहीं माणसें सर्वांना वेदाधिकार आहे असं बोलतात पण वागायला तयार होत नाहींत. कांहींची मजा अशी पाहिली आहे कीं सर्वांना वेदाधिकार हें मत मान्य, पण सर्व हिंदूंचा गायत्रीमंत्र हाच एक मंत्र असें म्हटलें कीं त्यांचा मस्तकशूळ उठतो! अशाची कीव करावी तितकी थोडीच आहे. जगातल्या चांगल्या तत्वावर सर्व जगाचा हक्क आहे हें जर खरें, तर सनातन वैदिक धर्माचा अधिकार सर्व हिंदूना आहे यात काय संशय! सारांश हिंदुधर्मातील उत्कृष्ट तत्वाचीं पक्वान्नें पंक्तिप्रपंचाचें

पातक न करता वाढण्याची कमिटीची इच्छा आहे. ही भूमिका ज्याना पसत पडेल तेच समानधर्मे भावीकालात हिंदुसमाजास वाचवितील.

कमिटीनें ठरविलेल्या विषयाप्रमाणें या पुस्तकाच्या शेवटीं आरत्या व स्तोत्रें यांचें परिशिष्ट द्यावयास पाहिजे होतें. परतु स्तोत्राची व आरत्याची छोटीं मोठीं पुस्तकें पुष्कळ आहेत म्हणून आरत्या व स्तोत्रें येथें छापिलीं नाहींत. बृहत्स्तोत्ररत्नाकरावरून सकटनाशनगणेशस्तोत्र, रामरक्षा, शिवापराधक्षमापनस्तोत्र, श्रीकृष्णाष्टक, उपमन्युकृतशिवस्तोत्र हीं स्तोत्रें, भूपाळ्या व प्रासादिक पदें विद्यार्थ्यांना शिकवावीं. नवनीताच्या शेवटीं हा सग्रह दिलेला आहे. गणपति, शकर, देवी, विठ्ठल, मारुती यांच्या लोकप्रसिद्ध आरत्या शिक्षकानीं विद्यार्थ्यांना शिकवाव्या.

हें पुस्तक लिहिल्यानतर तपासून पाहण्याचें काम श्री. वा. गो. आपटे सपादक आनद ( कमिटीचे सभासद ), रावबहादूर काळे सातारा, वे. शा. स. नारायणशास्त्री मराठे वाई, श्री. चिंतामणराव वैद्य पुणें, यानीं केलें याबद्दल त्याचे आभार मानले पाहिजेत. कल्याणचे वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध पेनशनर श्री बाबासाहेब साने यानीं आपल्या रोगग्रस्त स्थितींत पुस्तक शुद्धलेखन, भाषा व विषय या सर्व दृष्टींनीं काळजीपूर्वक पाहिलें आणि सूचना केल्या, म्हणून त्यांचा कृतज्ञता पूर्वक उल्लेख करून शवटीं दीनदयाळ ईश्वराचे चरणीं साष्टाग प्रणिपात करून हें प्रास्ताविक निवेदन सपवितों

| | |
|---|---|
| श्री गुरुपूर्णिमा<br>१८४८<br>प्राज्ञपाठ शाळा वाई. | महादेव शास्त्री दिवेकर<br>चिटणीस<br>हिंदुधर्म शिक्षण कमिटी. |

# टिळक महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथमाला.



## १ संस्कृत वाङ्मयाचा त्रोटक इतिहास.

लेखक-चिंतामण विनायक वैद्य एम् ए. एल् एल् बी.

टिळक महाविद्यालयात संस्कृत वाङ्मयाचा इतिहास या विषयावर लेखकानें दिलेल्या व्याख्यानांचा हा बहुमोल संग्रह असून श्री वैद्य यांचीं संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासा विषयींचीं मतें व पुष्कळच नवीन माहिती यांत संग्रहीत असल्यानें ह्या पुस्तकाची उपयुक्तता सर्वांस वाटेल. किंमत १॥ रुपया

## २ हिंदुधर्म–शिक्षण ( पुस्तक पहिलें ).

हें पुस्तक वाई प्राज्ञपाठशाळेतील अध्यापक ब्रह्मश्री महादेवशास्त्री दिवेकर यांनीं लिहिलें असून सर्व आबालवृद्धांस सुलभरीतीनें समजण्यासारखें झालें आहे यांत हिंदुधर्माचे सामान्य रीतीनें तात्त्विक विवेचन केलें असून लहान मुलांमुलींना धर्मशिक्षण देण्यास अत्यंत उपयोगी आहे सर्वांस घेण्यास सुलभ पडावें म्हणून किंमत फक्त ६ आणे ठेविली आहे

## ३ रसायन–परिभाषा.

लेखक–डॉ. मल्हार विनायक आपटे बी एससी एम् बी बी एस्.

टिळक महाविद्यालयांतील आयुर्वेद शाखेचे अध्यापक डॉ आपटे यांनीं रसायनशास्त्र विषयक मराठींमधील उपलब्ध पारिभाषिक शब्दांचा उपयोग करून एक नवीन रसायन परिभाषा निश्चित केली आहे. सर्व शिक्षण मातृभाषेंतून देऊं इच्छिणाऱ्यांना हें पुस्तक अपरिहार्य आहे किंमत ४ आणे.

मिळण्याचें ठिकाण—टिळक महाराष्ट्र विद्यापीठ पुणें.

# वाई प्राज्ञपाठशाळा मंडळाचीं कार्यें.

उच्चशिक्षण—स्वधर्म व स्वसंस्कृति प्रधान शिक्षण देऊन प्राचीन शास्त्रात निष्णात पंडित व बहुश्रुत धर्मोपदेशक तयार करणें

माध्यमिक शिक्षण—उच्च शिक्षणाला पोषक व टिळक विद्यापीठमान्य माध्यमिक शिक्षण सहा वर्षांत देणें.

लोक शिक्षण—धर्मसाहित्यसंग्रह, पुस्तकमाला व प्रचारक याच्याद्वारें हिंदुसमाजाच्या राष्ट्रीय जीवनाला पोषक अशी लोकजागृति करणें.

## मंडळानें प्रसिद्ध केलेलीं

## श्री. दिवेकर शास्त्री यांचीं पुस्तकें. —

१ अस्पृश्योद्धार—विचार २ धर्मभ्रष्टांचें शुद्धिकरण

३ क्षत्रियवैश्यांचें अस्तित्व ४ हिंदुविधवा धर्म.

चारी पुस्तकें एकत्र बांधलेलीं किं. १ रु ट ख ८४.

५ विद्यार्थिधर्म किं. ८१२ आ. ट. ख. ८४.



ॐ

धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा.

# हिंदुधर्मशिक्षण.

## पुस्तक दुसरें.

### पाठ पहिला.

#### संस्कार.

गुरुजी—मुलांनो, मी तुम्हांला आतांपर्यंत हिंदु कोणास म्हणावें, पुरुषार्थ म्हणजे काय, हिंदुधर्माचे आधारभूत ग्रंथ कोणते आणि हिंदुधर्माचीं सामान्य तत्त्वें कोणतीं यांचें दिग्दर्शन केलें; तें तुमच्या लक्ष्यांत असेलच.

मुलें—होय, आपण आतां पर्यंत सांगितलेला विषय आम्हांला समजला. आतां पुढचा विषय सांगा.

गुरुजी—ठीक आहे. हिंदुधर्मामध्यें विद्यार्थी आणि त्यांचीं कर्तव्यें याविषयीं जें सांगितलें आहे तें मी तुम्हास सांगतों.

मुलें—आमच्या सारख्या मुलांना सुद्धां कर्तव्यें आहेत काय? आम्हांला असें वाटतें कीं सगळीं कर्तव्यें नि कामें मोठ्या माणसां करितांच आहेत.

गुरुजी—अरे, तुम्ही समजतां तसें नाहीं. पूर्वी विद्येला प्रारंभ वयाच्या आठव्या वर्षापासून होई. विद्येला प्रारंभ गुरूच्या घरीं जाऊन

करावा लागे. विद्येला प्रारंभ करण्यापूर्वी एक संस्कार करावा लागतो. विद्यारंभ किंवा उपनयन संस्कार झाला कीं तुम्ही धर्माच्या मर्यादेंत आला. तेव्हापासून कर्तव्याला प्रारंभ होतो.

शांतशील—उपनयन म्हणजे काय नि संस्कार म्हणजे काय?

गुरुजी—जरा थांबा. मी हळूहळू हाच विषय तुम्हाला सांगणार आहें. आजच्या पाठाचा विषय संस्कार हाच आहे. संस्कार म्हणजे काय हें तुम्हा कोणाला ठाऊक आहे?

दया—नाहीं. आम्हाला संस्कार म्हणजे काय तें माहीत नाहीं.

गुरुजी—संस्कार म्हणजे चांगलें करणें. उत्कृष्ट स्थिति प्राप्त करून घेण्यासाठीं मूळच्या स्थितींत चांगले चांगले फरक करणें म्हणजे संस्कार करणें होय. नीट लक्षांत यावें म्हणून मी तुम्हाला एक दोन दृष्टांत घेऊन सांगतों. हें पाहा, मी ज्या खुर्चीवर बसलों आहे ती कशाची केली आहे?

रामनाथ—ती लाकडाची आहे. बसण्याची जागा फळ्याची केलेली आहे.

गुरुजी—या फळ्या कोठून आल्या?

कृष्णा—रानांत मोठमोठीं झाडें असतात, तीं तोडतात. तोडल्यावर तीं वाळलीं म्हणजे अरकसाकडून त्यांच्या फळ्या नि तुकडे कापवितात. नंतर पुढें सुतार त्या खुर्चीवर बसवितो आणि त्याची खुर्ची करतो.

गुरुजी—कृष्णाच्या म्हणण्याप्रमाणें लाकुडतोड्यानें पहिल्यानें झाडावर तोडण्याची क्रिया म्हणजे संस्कार केला. सूर्यकिरणांनीं पावर वाळविण्याचा दुसरा संस्कार केला. अरकशानें फळ्या काप-

ण्याचा तिसरा संस्कार आणि सुतारानें खुर्ची करण्याचा संस्कार केला. अरे सुभानगिरी, आतां संस्कार या शब्दाचा अर्थ कांहीं लक्षांत आला का!

सुभानगिरी—जरा जरा आला.

गुरुजी—आपण जो दररोज भात खातों त्यावर किती क्रिया म्हणजे संस्कार होतात पाहा. शेतांतून आलेलें भात भरडणें नि त्याची करड करणें हा पहिला संस्कार. करड सडून तांदूळ करणें हा दुसरा संस्कार. तांदूळ निवडणें नि धुणें हा तिसरा संस्कार आणि ते शिजविणें हा चौथा संस्कार होय. हे चार संस्कार झाले तरच आपण जो भात खातों तो तयार होतो. तुम्ही अंगांत जीं वस्त्रें घालतां त्यांच्यावरही असे संस्कार झालेले आहेत. कापसांतील केर-कचरा नि सरकी काढणें, सूत काढणें नि विणून कापड तयार करणें, इतके संस्कार झाले म्हणजे कापड तयार होतें. प्रेमचंद, संस्कार म्हणजे काय हें आलें का आतां तुझ्या लक्षात!

प्रेमचंद—आलें, आलें. आमच्या शेजारीं एक कोष्टी आहे, त्याच्या घरीं आपण जे म्हणतां तें सर्व मीं पाहिलेलें आहे. गुरुजी, आपण म्हणतां त्या प्रमाणें मुळींच संस्कार न झालेली वस्तु जगांत एखादी तरी आहे काय?

गुरुजी—छे! मुळींच नाहीं. संस्कार न केलेली वस्तु कधींही उपयोगाला येत नाहीं. हा या दाराला लावलेला धोंडा पाहा. त्याच्या-वर सुद्धां संस्कार झालेले आहेत.

यमा—दगडावर, लाकडावर, तांदुळावर सुद्धा संस्कार होतात हें मला समजलें. पण माणसावर संस्कार करावयाचे म्हणजे काय

करावयाचें ? त्याना दगडाप्रमाणें घडावयाचें ? का लाकडाप्रमाणें तासावयाचें ? कां तांदुळाप्रमाणें शिजवावयाचें ? करायचें तरी काय ?

गुरुजी—मनुष्य हा विचारवान् आणि जिवंत प्राणी असल्यामुळें त्याच्या मनावर, ज्ञानेंद्रियावर आणि कर्मेंद्रियावर माणुसकी उत्पन्न होण्याच्या दृष्टीनें संस्कार करावयाचे असतात. शरीर, मन, वाणी हीं पवित्र व्हावीं, अंत:करणात सद्गुणाचा उदय व्हावा, ईश्वरनिष्ठा वाढावी, म्हणून मनुष्यावर शिक्षणाचे, चांगल्या सहवासाचे आणि धर्माचरणाचे संस्कार करावयाचे असतात.

भागीरथी—कोणते धार्मिक संस्कार करावयाचे असतात ?

गुरुजी—हें पाहा, हिंदुधर्मशास्त्रानं प्रत्येक हिंदूचे एकदर ४८ संस्कार करावे, असें सांगितलें आहे. पण या अठ्ठेचाळीसांपैकी सोळाचीं नावें मात्र काहीं काहीं लोकांना माहीत आहेत. प्रत्यक्ष व्यवहारात तर चार पाचच संस्कार होत असतात. प्रत्येक धर्मांत त्या त्या धर्माचे म्हणून कांहीं संस्कार असतातच. मुसल्मान आणि खिस्ती धर्मांत सौनतविधि ( सुंता ) नि बाप्तिस्मा हे आपल्या मुंजीसारखे संस्कार आहेत.

पुरुषोत्तम—अठ्ठेचाळीस संस्काराची राहिली, पण सोळा संस्काराची तरी कांहीं माहिती आम्हास देता ना ?

गुरुजी—होय. जन्माला येण्यापूर्वी तीन संस्कार करावयाचे असतात. त्याना गर्भाधान, पुंसवन व सीमन्तोन्नयन असें म्हणतात. जन्मापासून उपनयनापर्यंत जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, चौल आणि उपनयन म्हणजे मुंज असे संस्कार करावयाचे असतात.

संतोषा—या शब्दाचा कांहींच अर्थ आम्हांस समजला नाहीं.

गुरुजी—जन्माला आल्याबरोबर मुलाच्या तोंडांत सोन्याच्या अंगठीनें थोडें तूप नि थोडा मध घालावयाचा त्यास जातकर्म म्हणतात. बाराव्या दिवशीं मुलाचे कान टोंचणें, त्याला पाळण्यांत घालणें आणि नांव ठेवणें याला नामकरण संस्कार म्हणतात. मूल दहा महिन्याचें होऊन अन्न खाण्याची चेष्टा करूं लागलें कीं त्याला खीर खाऊं घालणें याला अन्नप्राशन किंवा उष्टावण म्हणतात. प्रत्येक हिंदूची हिंदुत्वाची खूण म्हणून शेंडी राखण्याचा जो संस्कार करतात त्याला चौल म्हणतात. पुढचा संस्कार म्हणजे उपनयन किंवा मुंज. त्यापुढचे संस्कार म्हणजे मेधाजनन, महानाम्नी, महाव्रत, उपनिषद्, गोदान, समावर्तन, विवाह, आणि अंत्येष्टि हे होत.

प्रेमचंद—अबब! फार नांवें झालीं. या सर्व संस्कारांपैकीं मुख्य संस्कार कोणते?

गुरुजी—उपनयन, ( विद्यारंभ ) विवाह आणि अंत्येष्टि हे संस्कार मुख्य आहेत. हिंदुत्वाची खूण म्हणून सर्व हिंदूंचे निदान तीन तरी संस्कार अवश्य झाले पाहिजेत असें अलीकडे सर्वांना वाटूं लागलें आहे.

दया—हे सर्व संस्कार सर्व हिंदूंचे म्हणजे पुरुषांचे नि बायकांचे सुद्धा? ब्राह्मणांचे, मराठ्यांचे नि महारांचेही संस्कार करावयाचे काय?

गुरुजी—होय, सर्व हिंदु स्त्रीपुरुषांना हे तीन संस्कार अत्यंत आवश्यक आहेत म्हणून ते सर्वांनीं केले पाहिजेत.

यमा—उपनयन म्हणजे मुंज, मुंज म्हणजे लंगोटी नि जानवें घालणें. हाच का या संस्काराचा अर्थ?

गुरुजी—उपनयन म्हणजे गुरूजवळ नेणें, विद्येला प्रारंभ करणें असा अर्थ आहे. विद्येला प्रारंभ करण्यापूर्वी हा संस्कार अवश्य केला पाहिजे. मनुष्याच्या ठिकाणीं विद्येच्या योगानें माणुसकी आणण्याकरितां उपनयन संस्काराची आवश्यकता आहे. उपनयन म्हणजे माणुसकींत आणण्याचा संस्कार. उपनयन म्हणजे विद्येला प्रारंभ करण्यापूर्वीचा संस्कार, असें असता हा मूळ अर्थ जाऊन मातृभोजनाची अंगत पंगत करणें, जेवणावळी घालणें, भिक्षावळींची मिरवणूक काढणें, नळे नि चंद्रज्योती उडविणें, असल्या भलत्या खर्चाच्या गोष्टी या धार्मिक संस्कारांत शिरल्या आहेत.

प्रेमचंद—मग या संस्काराचें खरें स्वरूप कोणतें?

गुरुजी—शुचिर्भूतपणानें गायत्री मंत्राचा उपदेश करणें, विद्येचें महत्त्व सांगणें आणि विद्यार्जन करीत असताना कोणते नियम पाळले पाहिजेत तें सांगणें, हेंच या संस्काराचें शास्त्रशुद्ध स्वरूप आहे.

अमृतलाल—उपनयन संस्कार करण्यास खर्च बराच येतो. या खर्चामुळें नि महागाईमुळें लोकांना मुंजी नकोतशा झाल्या आहेत.

गुरुजी—अरे, आतांच सांगितलें ना, कीं या शुद्ध धार्मिक संस्कारात समारंभ, मिरवणुकी, रोषनाई, नळे, चंद्रज्योती लावणें असल्या भलत्या गोष्टी आल्यामुळें विनाकारण खर्च होतो. त्या सर्व सोडून शुद्ध शास्त्रीय नि सूत्रोक्त संस्कार केला तर खर्च अगदीं थोडा येतो.

पुरुषोत्तम—अगदीं थोडा म्हणजे किती?

गुरुजी—कमींत कमी तीन रुपये आणि ज्यास्तींत ज्यास्तीं दहा रुपये.

प्रेमचंद—किती कमी खर्च हा! आता मजा झाली. मी घरीं जाऊन शेटजीना सांगतो.

गुरुजी—अरे, कमी खर्चाची बाब म्हणून तुझ्या शेटजींना बरें वाटेल. पण त्यांना असें सांग कीं वरील गोष्टींत विनाकारण खर्च न केल्यामुळें जो पैसा उरेल तो देशहितार्थ ज्या संस्था काम करीत आहेत त्याना द्या.

रामनाक—उपनयनानंतरचा मुख्य संस्कार कोणता?

गुरुजी—विवाह म्हणजे लग्न. पण या संस्काराची माहिती मी तुम्हांला आतां सांगत नाहीं. उपनयन झालें कीं विद्येला प्रारंभ होतो आणि समावर्तन हा संस्कार विद्या पुरी झाल्यावर करावयाचा असतो.

संतोबा—हे संस्कार कुणीं व कसे करावेत. ?

गुरुजी—उपनयन, विवाह हे सस्कार आईबापानीं अगर पालकांनीं वेदमंत्रानीं करावेत. अंत्येष्टि ही मुलानें अगर वारसानें करावी.

धोंडिबा—सस्कार करावयाला उपाध्याय किंवा जोशी हे पाहिजेत काय?

गुरुजी—उपाध्याय किंवा जोशी यांची कोणत्याही धर्मकर्माला मध्यस्थ म्हणून जरूरी नाहीं, तर मदतनीस म्हणून आहे. प्रत्येकानें आपापले संस्कार कुलाचार,नि धर्माचार स्वत करावेत परंतु प्रत्येकाला

धर्मकर्माची नि शास्त्राची माहिती नसते म्हणून माहितगार या दृष्टीनें जोशी अथवा उपाध्याय बोलवावा.

रामनाक--मग आम्ही वेदमंत्र शिकून हे संस्कार करावयास कांहींच अडचण नाहीं म्हणावयाची?

गुरुजी--अडचण मुळींच नाहीं. तुम्ही वेद शिका नि सुसंस्कृत व्हा, अशीच तुम्हांला धर्माची आज्ञा आहे. असो. तुम्हांला संस्काराची माहिती आतां जेवढी सांगितली तेवढी पुरे आहे. उपनयन संस्कार झाल्यानंतर तुमच्या आयुष्याच्या एका महत्वाच्या भागाला प्रारंभ होतो. त्याला ब्रह्मचर्याश्रम असें म्हणतात.

अमृतलाल--गुरुजी, आश्रम म्हणजे काय? आणि ब्रम्हचर्य म्हणजे काय?

गुरुजी--हिंदुधर्मांत आश्रमधर्माचें आणि वर्णधर्माचें म्हणजे वर्णाश्रम या संस्थेचें फारच महत्त्व आहे. वर्णसंस्थेबद्दलचे विचार समजण्यास तुम्ही अद्याप व्हान आहां. पुढच्या पाठांत आश्रमाची माहिती सांगून विद्यार्थिदशेचें महत्त्व किती आहे याचें विवेचन करीन.

---

## पाठ दुसरा.

### विद्यार्थिदशेचें महत्त्व.

चंपावती--मुंज झाल्यावर मुलाला ब्रह्मचारी कां म्हणतात?

गुरुजी--ब्रह्म म्हणजे वेद किंवा विद्या. अर्थात् वेदाध्ययनाला म्हणजे विद्या शिकण्याला जो आचार पाहिजे तो आचार हा विद्यार्थी करूं लागतो, म्हणून त्यास ब्रह्मचारी म्हणतात. चार आश्रमांपैकीं हा पहिला आश्रम आहे.

गोविंदा—गुरुजी, आश्रम म्हणजे काय?

गुरुजी—आश्रम म्हणजे आयुष्याचा एक भाग किंवा अवस्था. हिंदुधर्मांत आयुष्याचे मुख्य चार भाग मानिलेले आहेत. त्याना अनुक्रमें ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ आणि संन्यास अशीं नावें आहेत.

कृष्णा—या सर्वांच्या अर्थाची अधिक फोड केली तर आम्हास नीट समजेल.

गुरुजी—विद्यार्थिदशा हा पहिला आश्रम होय. यालाच ब्रह्मचर्याश्रम असें म्हणतात. वयाच्या आठव्या किंवा दहाव्या वर्षांपासून या आश्रमास आरंभ होतो आणि वीस ते पचवीस वर्षांपर्यंत हा आश्रम असतो.

धोंडिबा—वयाच्या पंचवीस वर्षांनतर कोणता आश्रम?

गुरुजी—विद्या सपली आणि लग्न करून घेतलें म्हणजे गृहस्थाश्रमाला प्रारभ होतो. सर्व आश्रमात हाच आश्रम मुख्य मानिला आहे. या आश्रमामुळेंच अनेक कुटुंबें व्यवस्थितपणें राहून मनुष्यजातीची वृद्धि होते. पैसा मिळविणें, घर बाधणें, मुलबाळें होणें, कुटुंब, ग्राम, जात, देश, धर्म या सबधाचीं जीं जीं कर्तव्यें असतील तीं तीं सर्व याच आश्रमात करावयाचीं असतात.

वया—गृहस्थाश्रमाच्या पुढचा कोणता आश्रम?

गुरुजी—वयाच्या साठ पाऊणशें वर्षांपर्यंत गृहस्थाश्रमात राहून ससाराचा गाडा हाकला, नातवडेंपतवडें झालीं, पैसा नि कीर्ति याचा मनाप्रमाणें लाभ झाला, घरचें, दारचें, बाहेरचें, व्यावहारिक सुख म्हणून जेवढें आहे तेवढें उपभोगिलें, म्हणजे मनुष्याला स्वाभाविक-

पणेंच असें वाटतें कीं नको हीं दगदग आणि नको हा संसार! संसार सोडून परमार्थ करावयास लागणें यासच वानप्रस्थाश्रम म्हणतात.

रामचंद्र--शेवटचा आश्रम कोणता आणि त्यांत काय करावयाचें असतें?

गुरुजी--शेवटचा आश्रम म्हणजे संन्यास होय. वानप्रस्थाश्रमांत मनुष्याचा थोडा तरी स्वार्थ असतोच. पण या आश्रमांत संन्याशाचा स्वतःचा स्वार्थ किंचितही नसतो. द्रव्य, लौकिक, सुखें, उपभोग या सर्वांच्या पलीकडची म्हणजे ईश्वरप्राप्तीची प्रबळ इच्छा मनुष्यामध्यें असते. तदनुसार तो संन्यासी ईश्वरप्रीत्यर्थ मरेपर्यंत ईश्वराचें भक्तिभावानें स्मरण करीत नि लोकांना उपयोगी अशा पुष्कळ गोष्टी करीत राहतो. नद्या सर्वांना प्यायला पाणी देतात, झाडें फळें देतात, सूर्य प्रकाश देतो, त्यांत जसा त्यांचा मुळींच स्वार्थ नसतो, तसा चौथ्या आश्रमांतील मनुष्याचा कोणत्याही कृत्यांत तिळमात्रही स्वार्थ नसतो. पूर्ण निःस्वार्थ बुद्धीनें लोकांना उपयोगी अशीं कृत्यें करणें, तीं करीत असतां लोकांना आपल्या ज्ञानाचा आणि अनुभवाचा उपयोग करून देणें, ईश्वरभजनाकडे लोकांना लावणें, अशाच गोष्टी या चौथ्या आश्रमांत करावयाच्या असतात. मरेपर्यंत असा ज्याचा वर्तनक्रम असतो तोच संन्यासी होय.

मोरू--आपण सांगितल्याप्रमाणें जर आश्रमांची व्यवस्था असेल तर या चारी आश्रमांतील कर्तव्यें करण्यास आयुष्य बरेंच पाहिजे असें वाटतें.

गुरुजी--अरे, बरेंच म्हणजे दोनचारशें वर्षांचें नव्हे. अवघें

शंभर वर्षांचें आयुष्य चारही आश्रम योग्य तऱ्हेनें पार पाडण्यास पुरेसें आहे. ' शतायुर्वै पुरुषः ' म्हणजे मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षे आहे असें वेदांत सांगितलें आहे.

गंगू—शंभर वर्षे आयुष्य ? मग परवा आमची आत्या वयाच्या चाळिसाव्या वर्षी मेली नि आमचे काका ४९ वर्षांचेच होऊन मेले. हें कसें झालें ?

गुरुजी—मनुष्यानें दक्षपणानें आपलें वर्तन ठेविल्यास आणि आरोग्यशास्त्राचे आणि वैद्यशास्त्राचे नियम पाळल्यास त्यास शंभर वर्षें पर्यंत जगण्यास कांहीं हरकत नाहीं, असा सर्व साधारण सिद्धांत आहे. मनुष्याला अपमृत्यु म्हणजे अकालीं मरण येत नाहीं असें नाहीं; परंतु तें टाळण्याचें बऱ्याच अंशीं मनुष्याच्या हातांत आहे.

तुळसा—मग जीं माणसें लवकर मरतात, त्यांच्या वागण्यांत कांहीं चुकी होते असें म्हणावयाचें ?

गुरुजी—होय. जगांतल्या सुधारलेल्या देशांत मनुष्यें पुष्कळ दिवस जगतात. त्या मानानें हिंदुस्थानचीं माणसें लवकर मरतात. दारिद्र्य, अज्ञान, हलगर्जीपणा, इत्यादि कारणांमुळें आपण पुष्कळ दिवस जगत नाहीं. पुष्कळ मनुष्यांना आरोग्यशास्त्राचे नि स्वच्छतेचे साधे साधेही नियम माहित नसतात. मुलांनो, आजच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे शंभर वर्षें जगण्याचा मनुष्याचा हक्क आहे. तुम्ही मनुष्य आहात, म्हणून या हक्काचें संरक्षण तुम्हीं केलें पाहिजे.

रामनाक—गुरुजी, खरोखर शंभर वर्षे जगतां येईल काय ?

गुरुजी—अरे, होय. ही आपल्या शाळेची इमारत किती वर्षे

टिकेल असें तुला वाटतें ? ही इमारत जर चांगल्या तऱ्हेनें वापरली, तिची वेळच्या वेळीं चांगली डागडुजी केली, विजेचें भय, आगीचें भय केव्हाही उत्पन्न होणार नाहीं अशी व्यवस्था ठेविली, तर हीच इमारत पाच सहाशें वर्षें टिकेल. नाहून या इमारतीचा उकिरड्या-सारखा जर आपण उपयोग केला नि तिची कोणत्याही प्रकारची काळजी घेतली नाहीं, तर ती लवकरच ढासळेल. शरीररूपी इमा-रतीची ही अशीच स्थिति आहे.

संतोबा—ही इमारत शंभर वर्षें टिकविण्याकरता काय काय करावयास पाहिजे ?

गुरुजी—बरोबर विचारलेंस. कोणतीही इमारत भरभक्कमपणें टिकण्यास तिचा पाया मजबूत असावा लागतो. तुम्ही आयुष्यरूपी इमारतीचा पाया जो ब्रह्मचर्याश्रम तो चांगला घातला पाहिजे. ब्रह्म-चर्याचा चुना आणि सद्गुणाचे धोंडे यानीं हा पाया भरून काढला पाहिजे. तुम्ही पाया चांगला मजबूत केलात म्हणजे पुढील तीन आश्रमाचे तीन मजले तुम्हाला चांगले उठविता येतील. वयाच्या आठव्या वर्षांपासून पचवीस वर्षांपर्यंतचा हा काल—हा विद्यार्जनाचा काल—हा इमारतीचा पाया घालण्याचा काल—फार फार मह-त्त्वाचा आहे, हें नीट लक्षांत ठेवा.

गोविंद—लहानपण इतकें महत्त्वाचें असतें काय ? आम्हाला वाटतें लवकर लवकर मोठें व्हावें. मोठे झालों कीं सगळा मोठेपणा येतो.

गुरुजी—ती तुमची चूकी आहे. हीं पहिलीं पचवीस वर्षें एकदा इकडे तिकडे गेलीं, म्हणजे सर्व आयुष्य फुकट गेलें असें समजा. विद्यार्थिदशा ही आयुष्याची मुळी आहे. मुळी तोडल्यावर

जशी झाडाची स्थिति होते, तशी तुमच्या आयुष्याची होईल. वयाचीं पंचवीस वर्षे म्हणजे ऐन तारुण्याचा काळ. रामदास स्वामींचा 'सदा सेवि' हा श्लोक म्हण पाहूं?

**पुरुषोत्तम**—'सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं' × × ×

**गुरुजी**—समर्थांनीं यांत आत्मचरित्र सांगितलें आहे. बाराव्या वर्षी भर लग्नसमारंभांतून त्यानीं पलायन केलें आणि तपश्चर्येचा मार्ग धरिला. रामदासांनीं जर तारुण्य फुकट घालविलें असतें, तर त्यांना समर्थ हें नांव कधीं तरी मिळालें असतें काय?

**शान्तशील**—या विद्यार्थिदशेमध्यें काय मजा असते?

**गुरुजी**—जगात अशी मजा आहे कीं मनुष्य ज्या स्थितींत असतो त्या स्थितीची त्याला कल्पना नसते. मी जेव्हां तुमच्या एवढा होतों, तेव्हां मला लहानपणच्या सुखाची किंमत नव्हती. मला आता त्या लहानपणचें महत्त्व वाटूं लागलें आहे. लहानपणीं सगळें जग नवीन असतें. जिज्ञासा, कौतुक, आवड हे गुण फार प्रबळ असतात. अंगात तारुण्य मुसमुसत असलें कीं जगाची पर्वा वाटत नाहीं. खाणें, पिणें, खेळणें, वागडणें, उड्या मारणें यांत जीव इतका रंगून जातो कीं देहभान राहात नाहीं. काळजी माहीत नसते. ऋतूंमध्यें वसंत ऋतु किंवा सप्त स्वरात कोकिळेचा पचमालाप जसा गोड लागतो, तसा शंभर वर्षांच्या आयुष्यांत विद्यार्थिदशा हाच फार मजेचा काळ असतो.

**कृष्णा**—या वेळीं आम्हीं काय काय मिळविलें पाहिजे?

**गुरुजी**—व्यापारी भाषेनें बोलावयाचें तर तुम्ही सर्व प्रकारचें भाडवल यावेळीं मिळविलें पाहिजे. भाडवलाचा पुरवठा चांगला

असल। म्हणजे व्यापार चागला चालतो. भाडनल नसलें की दिवाळें वाजतें. पंचवीस वर्षांनतर तुम्हाला जीं जीं कर्तव्यें करावयाचीं आहेत, त्याना लागणारे सर्व सद्गुण, विद्वत्ता आणि कर्तृत्व हीं तुम्हीं विद्यार्थिदशेंत संपादन केलीं पाहिजेत. मर्दपणा, धाडस, काटकपणा, करारीपणा, दया, परोपकार, शांति या सर्व गुणाचा परिपोष याच वयात होत असतो. विद्यार्थिदशेंत तुमच्या ठिकाणीं माणुसकी उत्पन्न झाली, तरच तुम्ही मर्दाप्रमाणें खस्तीचीं कामें करूं शकाल आणि ' उदंड खस्तीचीं कामें । मर्द मारूनि जातसे ' हें समर्थांचें बोलणें खरें करून दाखवाल. कुमाराचे कच्चें नि ओलें मडकें तुम्हीं पाहिलें कीं नाहीं?

वसंत—होय, पाहिलें आहे. पण त्याचा नि आमच्या विद्यार्थिदशेचा काय संबंध आहे?

गुरुजी—कुंभाराच्या चाकावर जो मातीचा गोळा असतो त्याला पाहिजे तसें वळण आणि आकार देता येतो. परंतु तें कच्चें मडकें एकदां पक्कें झालें कीं त्यावर काहींच करतां येत नाहीं. विद्यार्थिदशा ही कच्च्या मडक्या सारखी आहे. तुम्हीं यावेळीं या मडक्यावर जर चांगले संस्कार केलेत तर तुमचें आयुष्य सुखदायक होऊन तुम्हांला पश्चात्तापाचा प्रसंग येणार नाहीं. रात्रीं कोणाला चांगली झोप येते ठाऊक आहे का?

शांता—दिवसा जो निजत नाहीं त्याला.

गुरुजी—दिवसभर जो आपलें कर्तव्य बिनचूक करीत असतो त्यालाच रात्रीं पाठ टेकल्या बरोबर गाढ झोप येते पूर्व वयात

म्हणजे विद्यार्थिदशेंत जो विद्यार्थिधर्माप्रमाणें वागतो, त्याचें पुढचें आयुष्यही फार चांगल्या तऱ्हेचें जातें.

कृष्णा--विद्यार्थिदशेचें महत्त्व काय आहे, हें आम्हांला समजलें. विद्यार्थिधर्म म्हणजे काय, आम्हीं कसें वागावें, काय करावें, हें सर्व आपण आम्हांला सांगा.

गुरुजी—विद्यार्थिदशेंतील तुमचें पाहिलें कर्तव्य ईश्वरनिष्ठा हें आहे. आई, बाप, गुरु नि वृद्ध यांचें आज्ञापालन हें दुसरें कर्तव्य आहे. शौचधर्म म्हणजे शरीर, मन, वाणी हीं पवित्र ठेवणें; तसेंच वस्त्रें, जागा, पुस्तकें हीं स्वच्छ ठेवणें हें तुमचें तिसरें कर्तव्य आहे. ब्रह्मचर्याचे नियम पाळून शरीर कमावणें हें चौथें कर्तव्य आहे. उत्तम अभ्यास करून विद्वान् होणें हें पाचवें, शीलसंपन्न होणें हें सहावें, आणि मातृभूमीचा अभिमान बाळगणें हें सातवें कर्तव्यकर्म आहे. ह्या कर्तव्यांचें आणि याशीं संबद्ध असलेल्या विषयांचें विवेचन यापुढें क्रमशः करीन.

---

## पाठ तिसरा.

### ईश्वर नि मनुष्य यांचा संबंध

गुरुजी—मुलांनो, कालचा विषय तुम्हांला नीट समजला ना ?

मुलें—होय. आपण काल सांगितलेला विषय आम्हांला चांगला समजला. आतां आपण आम्हांला पुढचा विषय सांगा.

गुरुजी—ठीक आहे. आज मी तुम्हांला तुमची ईश्वरनिष्ठा वाढावी म्हणून मनुष्य नि ईश्वर यांचा संबंध कसा आहे, याचो

थोडी कल्पना देतों. पण त्यापूर्वी त्याविषयीं तुमच्या स्वत:च्या काय कल्पना आहेत त्या मला सांगा. कृष्णा, देव नि मनुष्य या बद्दल तुला रे काय वाटतें?

**कृष्णा**—आमच्या पुस्तकांत एक अभंग आहे तो मला पाठ येतो. ' देवा आम्ही बाळ आमुचा सांभाळ। कीजे सर्व काळ दीनबंधो ॥ आम्हा बाळावर ममता अपार। देवा निरंतर असो द्यावी ॥ ' या अभंगावरून सर्व मनुष्यें देवाचीं मुलें आहेत आणि देव हा सर्वांचा बाप आहे, असें मला वाटतें.

**गुरुजी**—होय. तुझें म्हणणें अगदीं बरोबर आहे. ईश्वर सर्व जगाचें पालन पोषण करितो म्हणून तो सर्व जगाचा पिता आहे, हें तुझें म्हणणें बरोबर आहे.

**रामनाक**—गुरुजी, बाप जशी मुलावर ममता करितो तशीच ईश्वर आपणा सर्वांवर जर ममता करितो, तर मग आपणाला तो कां बरें दिसत नाहीं? आपले वडील नि आपणांवर ममता करणारे इतर लोक हे आपणास दिसतात. ते कोठें राहतात हेंही आपणास समजतें. तसें ईश्वराचें का होत नाहीं?

**गुरुजी**—अरे बाळ, ईश्वर हा सर्व ठिकाणीं आहे. प्रत्येक लहान मोठ्या वस्तूंत ईश्वर भरलेला आहे. ईश्वराला आकार नाहीं. म्हणून तो आपणास दिसत नाहीं. ईश्वर आपणास दिसत नाहीं तरी त्याचें प्रेम आपणास दिसतें.

**गंगू**—गुरुजी, आईबाप आम्हा मुलांना खाऊ पिऊं घालतात, अंगडीं टोपडीं देतात, आम्ही अजारी पडलों तर आमच्या बद्दल

अति कष्ट सोसतात, हें आईबापांचें प्रेम आम्हाला दिसतें तसें ईश्वराचें कां दिसत नाहीं ?

**गुरुजी**—मुलांनो, आईबापाचें प्रेम तुम्हांला दिसतें आणि आईबापां पेक्षा सहस्रपट प्रेम करणाऱ्या ईश्वराचें प्रेम तुम्हांला दिसत नाहीं, हें खरोखरीच आश्चर्य आहे, मुलांनो, तुम्ही थोडा विचार करा, म्हणजे तुम्हाला ईश्वराचें प्रेम दिसूं लागेल. गंगू, तुला तो अभंग येतो ना ? म्हण "पाहो जातां एक देव."

**गंगू**—होय, 'पाहो जातां एक देव। तेणें निर्मियेलें सर्व' ॥ चंद्र सूर्य पृथ्वी तारे। निर्मियेले त्यानें सारे। अन्न पाणी तोच देतो। प्रेमें सर्वां सांभाळीतो' ॥

**गुरुजी**—आतां तूंच विचार कर कीं, जो चंद्र आपणांला आनंददायक चांदणें देतो, त्याला कोणीं उत्पन्न केलें ? ज्याच्या प्रकाशांत आपण सर्व दिवसभर सर्व व्यवहार करतों त्या भगवान् सूर्यनारायणाला कोणीं बरें उत्पन्न केलें ? पाऊस कोण बरें पाडीत असेल ? कोणाच्या आज्ञेनें वारा वाहात असेल ? याचा विचार कर; म्हणजे ईश्वराच्या कृपेनेंच आपण सगळे जगलों आहोंत असें तुला दिसून येईल.

**यमा**—गुरुजी, ईश्वरानें आम्हा सर्वांना राहण्याकरितां जमीन, प्यायला पाणी, खायला अन्न आणि दिसावयाला उजेड दिला आहे, म्हणूनच आम्ही जिवंत आहोंत.

**गुरुजी**—मुलांनो, जमीन, पाणी, उजेड, वारा नि आभाळ म्हणजे पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पंच महाभूतें ईश्वरानें निर्माण करून मनुष्यांवर मोठा उपकार केला आहे. आई-

बाप आपल्याला अन्न देतात खरे; पण पाऊस जर न पडेल तर धान्य उपन्न होईल काय? कापूस पिकला नाहीं, तर वस्त्र कशाचें तयार होईल? आईबाप मग कोठून वस्त्रें आणतील? झाडांची हिरवीं गार पानें, बागेंतील फुलें, मोराचीं पिसें, तसेंच निरनिराळ्या ठिकाणची शोभा आणि देखावे पाहून आम्हांला आनंद होतो. पण ज्यापासून आपणांला आनंद होतो, ते पदार्थ जर ईश्वरानें उत्पन्नच केले नसते, तर काय स्थिति झाली असती?

**रामचंद्र**—आतां मात्र ईश्वराच्या कृपेमुळेंच सर्व जग चाललें आहे, अशी माझी खात्री झाली.

**गुरुजी**—थांबा, थांबा. तुमची चांगली खात्री करून देतों. तुम्ही तुमच्या शरीराची ठेवण पहा. तुमचें अंग मळलें तर आई-बाप धुवून तें स्वच्छ करतील. पण आईबापांना काळ्या मुलाला गोरा करितां येईल काय? नकटें नाक बरें दिसावें म्हणून हजार पांच-शेंची नथ गंगू, तुझा नवरा तुला करून देईल. पण नकटें नाक कोणाला तरी चांफेकळीसारखें करितां येईल काय? डोळ्यांत औषध घालून डोळ्याचा अधूपणा नाहींसा करतां येईल; परंतु पाणि-दार डोळे देणें हें काम ईश्वराचेंच आहे. जगांतल्या मनुष्यांप्रमाणें आईबापांनाही जें मिळालें आहे तें त्यांना कोणीं दिलें? मनुष्यांना आणि आईबापांना ज्या गोष्टी करतां येणार नाहींत अशा पुष्कळ गोष्टी जगामध्यें आहेत.

**प्रेमचंद**—गुरुजी, अशा कोणकोणत्या गोष्टी आहेत? त्या आम्हांला सांगाल तर बरें होईल.

**गुरुजी**—अरे, दगडमातीचीं घरें मनुष्य बांधू शकेल; पण

मनुष्याला दगड किंवा माती उत्पन्न करता येईल काय? निरनिराळ्या लांकडांच्या फळ्या, बाकें, खुर्च्या मनुष्याला करतां येतील; पण झाड उत्पन्न करतां येईल काय? निरनिराळ्या धान्यांचीं पक्वान्नें मनुष्य करू शकेल; परंतु पाऊसपाण्यावांचून धान्याची निपज मनुष्याला करतां येईल काय? या जगात ईश्वरानें केलेल्या एक का दोन किती गोष्टी आहेत म्हणून सांगूं! अरे, सर्व जग त्याच्याच कृपेनें चाललेलें आहे. ईश्वराची अवकृपा झाली कीं लगेच दुष्काळ पडतो आणि अन्न पाण्यावाचून मनुष्यें, पशु नि पक्षी हीं पटापट मरूं लागतात. ईश्वराच्या अवकृपेनें मोठमोठे धरणीकंप होतात, पृथ्वी फाटते आणि तींत मनुष्यें गडप होतात. तात्पर्य, सामान्य मनुष्याना साक्षात् ईश्वर दिसला नाहीं तरी त्याची कृति दिसते. त्यावरून आपल्याला अनुमानानें ईश्वराचें ज्ञान होतें.

रामचंद्र—आपण ईश्वराच्या शक्तीचें जें वर्णन केलें त्यावरून तो जगाचा मायबाप आहे अशी माझी खात्री झाली.

गुरुजी—ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास यांच्यासारखे सत्पुरुष ईश्वर हा जगाचा पिता, आचार्य नि त्राता आहे असें सांगतात. म्हणून आपण ईश्वरावर निष्ठा ठेवून वागलें पाहिजे.

कृष्णा—सत्पुरुष ईश्वर हा जगाचा पिता, त्राता नि आचार्य आहे असें कशावरून म्हणतात?

गुरुजी—बारा वर्षें रामायण ऐकून 'सीता कोण' असें विचारणारा तूं मुलगा दिसतोस. ईश्वराच्या शक्तीचें आता पर्यंत केलेलें विवेचन तू विसरलास काय? ईश्वर हा सर्वज्ञ आहे, सर्वशक्तिमान् आहे, अत्यंत न्यायी आहे, आणि परम दयाळु आहे. ईश्वराच्या या

गुणांचा मनुष्याला प्रत्यक्ष अनुभव पदोपदीं येत असतो. ईश्वराच्या गुणाला अंत नाहीं म्हणून त्याला अनंत असें म्हणतात. अनंताचे अनंत गुण जरी मनुष्याला न समजले, तथापि काहीं गुण प्रत्येकाच्या अनुभवाला येतात. त्यावरून ईश्वर हा जगाचा मायबाप, त्राता नि आचार्य आहे असें साधुसंत म्हणतात. साधुसंतांना ईश्वर भेटतो म्हणून आपण त्यांजवर विश्वास ठेविला पाहिजे. ईश्वराची जे अनन्य भावानें सेवा करतात, त्यांना तो भेटतो. श्रीशंकराचार्य, ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम यांना ईश्वर भेटला. त्याचें कारण त्यांनीं ईश्वराची मोठ्या निष्ठेनें सेवा केली हें होय.

**रामनाक**—ज्ञानेश्वर तुकारामांनीं ईश्वराची सेवा कशी केली?

**गुरुजी**—ज्ञानेश्वरादि संतांनीं परमेश्वरानें गीतेंत सांगितलेल्या वचनावर अढळ विश्वास ठेविला आणि स्वकर्तव्यें केलीं. 'परधर्मो भयावहः' अ. ३. 'सततं कार्यं कर्म समाचर' अ. ३. 'न मे भक्तः प्रणश्यति' अ. ९. 'तेषामहं समुद्धर्ता' अ. १२ (परधर्म भयप्रद आहे, सतत कर्तव्य कर्म कर, माझा भक्त नाश पावत नाहीं; त्याचा मी उद्धारक आहे) अशा तऱ्हेच्या प्रत्यक्ष भगवंतानें सांगितलेल्या वचनावर त्यांनीं श्रद्धा ठेविली; इतकेंच नव्हे तर आस्थेनें जगांतील कर्तव्येंही केलीं, म्हणूनच त्यांना ईश्वराचें दर्शन घडलें.

**रामनाक**—आमच्या जातींतल्या चोखा मेळ्याला ईश्वराचें दर्शन झालें होतें, असें आमच्या बाबांनीं मला सांगितलें.

**गुरुजी**—हें पाहा, ईश्वर हा लहानांना भेटतो, मोठ्यांना भेटतो, तरुण्यांना भेटतो, म्हाताऱ्यांना भेटतो, रावाला भेटतो, रंकाला भेटतो, ब्राह्मणाला भेटतो, महाराला भेटतो, स्त्रियांना भेटतो, पुरु-

पांना भेटतो, मनुष्य कोणत्याही जातींत कोणत्याही कुळांत कोणत्याही देशांत जरी जन्मला असला, तरी सर्वांवर सारखी कृपा करणारा परमेश्वर जे त्याची अनन्य भावनेने सेवा करितात, भक्ति करितात, त्याचें भजनपूजन करितात, त्यांना प्रत्यक्ष दर्शन देतो.

**शान्तशील**—आम्हांला ईश्वर भेटावासें वाटतें तेव्हां आम्हीं काय करावें?

**दया**—गुरुजींनीं ईश्वराची भक्ति करावी असें सांगितलें नाहीं का?

**गुरुजी**—अग, असें मध्यें बोलूं नये. ईश्वराची भक्ति केल्यानें ईश्वर भेटतो. पण ईश्वराच्या भक्तीचे अनेक प्रकार आहेत.

**संतोबा**—ते प्रकार कोणते?

**गुरुजी**—श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन असे भक्तीचे नऊ प्रकार आहेत. ईश्वराचें स्तवन कसें करावें, कोणत्या भावनेनें करावें, केव्हां करावें, इत्यादि गोष्टी मी तुम्हांला मुद्दाम पुढच्याच पाठांत सांगणार आहें. पण तेवढ्यानेंच ईश्वराचें दर्शन होतें असें नाहीं.

**मोरेश्वर**—तरमग ईश्वरदर्शनाला आणखी काय काय लागतें?

**गुरुजी**—ईश्वराच्या आज्ञेप्रमाणें वागलें असतां नि भक्ति केली असतां ईश्वर भेटतो.

**रामनाक**—ईश्वराच्या आज्ञा कुठें आहेत आणि त्या काय आहेत?

**गुरुजी**—मुलांनो, मी पूर्वी तुम्हांला जसा दशलक्षणी धर्म सांगितला तशाच प्रकारचा आचारधर्म, नीतिधर्म आणि कर्तव्य-

धर्मग्रंथात ज्या ईश्वराच्या आज्ञा असतील त्या तुम्हीं समजून घेऊन आपापलें कर्तव्य करा. मनुष्यानें आपापलें कर्तव्य ईश्वराला स्मरून नेहमीं करावें, म्हणजे मनुष्यावर ईश्वर संतुष्ट होतो. प्रत्येक मनुष्यानें आपापलें कर्तव्य उत्तम करून जगाचें रहाटगाडगें चालवावें अशी परमेश्वराची इच्छा आहे. म्हणून प्रत्येकानें आपापलें काम आळस किंवा कुचराई न करितां सदैव केलें पाहिजे.

**भागीरथी**—पण मनुष्य जर नेहमीं आपलें कामच करीत राहिला, तर त्याला ईश्वराचें स्मरण करण्याची आठवण होणार नाहीं आणि अवसरही मिळणार नाहीं.

**गुरुजी**—होय, बरोबर बोललीस. मनुष्य आपल्या कर्तव्यामध्यें दंग झाला, सर्व काहीं गोष्टी त्याच्या मनाप्रमाणें घडून यऊ लागल्या म्हणजे त्याला ईश्वराची आठवण होत नाहीं. सुखात, दु:खात, बऱ्या वाईट कोणत्याही प्रसंगीं कर्तव्य करीत असतां मनुष्यानें ईश्वराचें स्मरण ठेविलें पाहिजे, हें याच करितां सांगितलें आहे. मनुष्याला नेहमीं ईश्वराचा विसर पडतो म्हणून ईशस्मरण करावें, आणि आपण जगात आहों म्हणून जगाचा व्यवहार चालविण्याकरितां अखंड कर्म करीत राहावें. दयाघन परमेश्वराचें विस्मरण होऊं नये म्हणून त्याची भक्ति केली पाहिजे आणि जगाचा विसर पडू नये म्हणून कर्तव्य करीत राहिलें पाहिजे.

**प्रेमचंद**—दयाघन परमेश्वराला लोक विसरतात? मोठें आश्चर्य आहे!

**गुरुजी**—अरे, विसरणें हा मनुष्य स्वभाव आहे. तुम्ही नेहमीं सांगितलेलें काम विसरतां नि नियमही विसरतां. सर्व काहीं मनुष्या-

च्या मनासारखें घडूं लागलें कीं तो ईश्वराला आणि जगालाही विसरतो. मनुष्यानें जगताला नि देवाला विसरूं नये म्हणून शास्त्रकार आपापल्या कर्तव्यें करण्याबद्दल अट्टाहासानें सांगतात आणि साधुसंत ईश्वराचें विस्मरण होऊं नये म्हणून कंठरवानें उपदेश करीत असतात. गोविंद, तुला तो अभंग येत नाहीं का?

गोविंद—गुरुजी, तुकाराम महाराजांचा " कां रे नाठविसी " हा अभंग सर्वांना येतो.

गुरुजी—म्हणा तर तो अभंग.

मुलें—कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोषितो जगासी एकला तो ॥१॥ बाळा दूध कोण करितें उत्पत्ति । वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥२॥ फुटे तरूवर उष्ण काळमासीं । जीवन तयासि कोण घाली ॥३॥ तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनि ॥४॥ तुका म्हणे ज्याचें नाम विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यानकरी ॥५ ॥

गुरुजी—पाहा, साधु तुकारामांचा कसा कळकळीचा उपदेश आहे! परंतु असला उपदेश करणारे असतांना आणि ईश्वराच्या कृपेवांचून आपलें एक क्षणभरही चालणार नाहीं हें ठाऊक असून आपण ईश्वराला विसरतों. आमच्या सारखीं सामान्य माणसें ईश्वराला विसरतात यांत आश्चर्य नाहीं. छत्रपति शिवाजी महाराजांवर सुद्धां एकदा हा विस्मरणाचा प्रसंग आला होता.

अमृतलाल—शिवाजी महाराजांना त्या प्रसंगांतून कोणीं वांचविलें? काय गोष्ट असेल ती सांगा.

गुरुजी—अरे, तुम्हांला ती बेडकीची गोष्ट ठाऊक नाहीं?

तुम्ही हरिदासांच्या कथेमध्ये ती गोष्ट ऐकिली नाहीं काय ?

**गंगू**—हो हो, मला ती बेडकीची गोष्ट आठवली. तीच का गोष्ट ?

**गुरुजी**—हो तीच गोष्ट. स्वराज्यस्थापना झाल्यावर शिवाजी महाराजांना कृतकृत्य झाल्यासारखें वाटलें. आपला अंमल जिकडे तिकडे बसलासें पाहून त्यांना आपल्या सत्तेचा गर्व उत्पन्न झाला आणि ईश्वराच्या सत्तेचा विसर पडला. श्रीसमर्थांनीं शिवबाना सज्जन गडावर बोलावून नुकत्याच सुरुंगानें उखळून पडलेल्या एका कड्या-कडे नेलें नि दगडांतली जिवंत बेडकी दाखवून तिचें पोषण कोण करितो ? असें विचारिलें. दगडाच्या आंत असलेल्या त्या बेडकीला जीवन देणारा जगचालक प्रभु आहे, त्यापुढें आपली सत्ता क्षुद्र आहे, असें शिवाजी महाराजांना तत्काळ वाटलें आणि त्यांनीं समर्थांना साष्टांग नमस्कार घातला.

**सुभानगिरी**—आहा ! काय मजेची गोष्ट !!

**गुरुजी**—अरे, गोष्टीपेक्षां तात्पर्य लक्षांत ठेवा. ईश्वर जगाचा मायबाप कसा आहे, त्याची आपल्यावर कृपा कशी आहे, त्याचें नेहमी स्मरण करून आपण कर्तव्य कां केलें पाहिजे याचा सदैव विचार करा.

---

## तिसऱ्या पाठाची पुरवणी.

### बृहदारण्यकोपनिषद् अ. ३

एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि सूर्याचन्द्रमसौ विधृतौ तिष्ठतः । एतस्य वा । अक्षरस्य प्रशासने गार्गि द्यावा पृथिव्यौ विधृते

तिष्ठतः। एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि निमेषा मुहूर्ता अहोरात्राण्यर्धमासा मासा ऋतवः संवत्सरा इति विधृतास्तिष्ठन्ति। एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि प्राच्योन्या नद्यः स्यन्दन्ते। श्वेतेभ्यः पर्वतेभ्यः प्रतीच्योऽन्या यां यां च दिशमन्वेतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि ददतो मनुष्याः प्रशंसन्ति।

## ब्रह्मविद्योपनिषद्

"भीषास्माद्वातः पवते। भीषोदेति सूर्यः।
भीषाऽस्मादग्निश्चेन्द्रश्च। मृत्युर्धावति पञ्चमः।"

## भागवत

यद्भयाद्वाति वातोऽयं सूर्यस्तपति यद्भयात्।
यद्भयाद्वर्षते देवो भगणो भाति यद्भयात्॥
यद्वनस्पतयो भीता लताश्चौषधिभिःसह।
स्वे स्वे कालेऽभिगृह्णंति पुष्पाणिच फलानिच॥
स्रवन्ति सरितो भीता नोत्सर्पत्युदधिर्यतः।
अग्निरिन्धे सगिरिभिर्भूर्न मज्जति यद्भयात्॥

## नामदेव.

तुझिया सत्तेनें वेदासी बोलणें। सूर्यासि चालणें तुझिया बळें॥
ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धनी। वर्म हें जाणुनी शरण आलों॥
मेघांनीं वर्षावें पर्वतीं बैसावें। वायूनें विचरावें सत्तें तुझें॥
नामा म्हणे कांहीं न हाले साचार। प्रभु तूं निर्धार पांडुरंगा॥

## श्रीज्ञानेश्वरी अध्याय ९

तो विश्वश्रियेचा भर्ता। मीचि गा एय पाडुसुता। मी गोसावे समस्ता। त्रैलोक्याचा ॥ २८० ॥ आकाशें सर्वत्र वसावें। वायूनें नाव भरी उगें नसावें। पावकें दाहावें। वर्षावें जळें।' २८१ ॥ पर्वत वैसका न संडावी। समुद्रीं रेखा नोल्लांडावी। पृथ्वीया भूतें वाहावं हे आज्ञा माझी ॥ २८२ ॥ म्या बोलविल्या वेद बोले। म्या चाल विल्या सूर्य चाले। म्या हालविल्या प्राण हाले। जो जगातें चाळिता ॥ २८३ ॥ मियाचि नियमिला साता। काळ ग्रासितसे भूता। इयें म्हणियागतें पांडुसुता। सकळें जयाचीं ॥ २८४ ॥

## दासबोध दशक २० समास ८

ईश्वरें केवढें सूत्र केलें। सूर्यानिर धानाया लाविलें। धुकटाकरवीं धरविलें। अगाध पाणी ॥ २३ ॥ पर्वता ऐसे ढग उचलती। सूर्यबिंबासि आच्छादिती। तेथें सर्वेचि वायोची गती। प्रगट होये ॥२४॥ झिडकझिटकू धावे वारा। जैसा काव्यचा म्हणियारा। ढग मारूनी दिनकरा। मोकळे करी ॥ २५ ॥ वैसती निजाच तडाखे। प्राणीमात्र अवचिता धाके। गगन कडकडून तडके। स्थळांतरीं ॥२६॥

## श्रीसमर्थ.

आम्हां काय कुणाचें खातों रे। तो राम आम्हाला देता रे॥ ध्रु०॥
बाधिले घुमट शिळ्याचे तट। त्याला फुटती पिंपळवट।
तयें कोण लागितो मोट। कुडाला पाणि घालितो ? ॥ १ ॥
खडक फोडिता सजिव रोडकी। सर्वांनीं पाहिली वडकी।
सिंधु नसुनी नियर्चे मुखीं। पाणि कोण घालितो ? ॥ २ ॥

पह्मापहा मातेचिये स्तनीं । चिंतितां रक्तमांस मळघाणी ।
तयास्थळीं विमल दुग्ध घालोनी । गर्भी कोण पोसीतो ? ॥ ३ ॥
नसतां पाण्याचे बुडबुडे । गगन सदासर्वदा कोरडे ।
**दास** म्हणे जीवन चहूंकडे । पाडुनि सडे पीक उगवितो ? ॥ ४ ॥

## तुकाराम.

चालें हे शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवितें हरीवीण ॥१॥
देखवी ऐकवी एक नारायण । तयाचें भजन चुकों नका ॥ २ ॥
माणसाची देव चालवी अहंता । मीचि एक कर्ता म्हणोनिया॥४॥
वृक्षाचेंही पान हाले त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें॥४॥
तुका म्हणे विठो भरिला सबाहीं । तया उणें कांहीं चराचरीं॥५॥
त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमचे त्या काई असें वोझें॥१॥
पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चार कोण घाली॥२॥
पक्षी अजगर न करी संचीत । तयासि अनंत प्रतिपाळी ॥३॥
तुका म्हणे तया भार घातलिया । उपेक्षीना माझा दयासिंधु॥४॥

## मोरोपंत—( केका. )

सदाहि हित नायको बहु अपाय केले करूं । तरी सकृप बाप तूं म्हणसि नायके लेकरूं ॥ कधीं नकरिसि प्रभो भजक बाळकोपेक्षण । न तूजवरी ज्यापरी पशुपपाळ कोपेक्षण ॥ १२ ॥ खरा जनक तूं जनां इतर कोण हो देव वा ? । समीहित फळें जगा तव पदाब्ज दे देववी । अशीच करुणा असो हरि, कधीं न भंगो पिता । अशा मज असाधुला इतर कोण संगोपिता ॥ १३ ॥ सुविद्य धन मेळनी वचन आयके आवरीं । प्रपंचभर घे शिरीं करिं कृपा पिता

त्यावरी। असा जरि नसे, रुचे तरि न तो अभद्रक्षण। तसा तुजचि आवडे करिसि तूचि तत्क्षण ॥ ९४ ॥

---

## पाठ चौथा.

### नित्य धर्मकर्म आणि वैदिक ईशस्तवन.

गुरुजी—ईश्वरनिष्ठा हें तुमचें पहिलें कर्तव्य आहे. त्या करिता ईश्वर नि मनुष्य याचा संबंध कसा आहे, हें मी तुम्हाला सांगितलें. ईश्वर निष्ठा वाढावी आणि धर्माचरणाचें समाधान प्राप्त व्हावें म्हणून मी तुम्हाला तुमचीं नित्याचीं धर्मकर्में सांगणार आहें.

रामनाक—सर्व हिंदूचीं रोजचीं धर्मकर्में कोणतीं?

गुरुजी—हिंदुमात्रानें प्रातःस्मरण, स्नान, दोन वेळचीं ईश्वरोपासना नमस्कार आणि गीतापाठ एवढें नित्यकर्म केलेंच पाहिजे. तें न करील तर तो हिंदु म्हणवून घेण्यास अपात्र ठरेल.

कृष्णा—प्रत्येक हिंदूनें दररोज प्रातःस्मरण म्हटलेंच पाहिजे काय?

गुरुजी—होय. सकाळीं सूर्योदयापूर्वीं उठून चूळ भरून प्रत्येक हिंदु स्त्रीपुरुषानें ईशस्मरण केलें पाहिजे. प्रातःस्मरणाचे आठ श्लोक पूर्वीं मी तुम्हाला सांगितले आहेत. ( हिंदुधर्मशिक्षण, पुस्तक पहिलें, पाठ १४ पहा ) ते श्लोक सोपे असून त्यांत पुष्कळ अर्थ आहे. प्रातःस्मरणाच्या त्या आठ श्लोकांत जगचालक परमेश्वर पंचमहाभूतें, ऋषी, पुण्यश्लोक राजे, भगवद्भक्त, चिरंजीव विभूति आणि पतिव्रता पंचक इतक्यांचें स्मरण करण्यास सांगितलें आहे.

प्रातःस्मरणानें ईश्वरभक्ति वाढते, चित्त प्रसन्न होतें, आणि आपल्या पूर्व परंपरेची खरी कल्पना येते.

त्रया—प्रातःस्मरणाप्रमाणें स्नानही प्रत्येक स्त्रीपुरुषानें केलेंच पाहिजे ना?

गुरुजी—होय. स्नान हें शरीरशुद्धीकरितां आवश्यक आहेच आहे; पण मनःशुद्धी करितांही तें पाहिजे. हिंदुस्थानाचें हवा-पाणी कांहीं प्रांत सोडल्यास दररोजच्या स्नानाला अनुकूल असेंच आहे. स्नान थंड पाण्यानें करावें. अजारी असल्यास ऊन पाण्यानें करावें. स्नानाचें विस्तृत विवेचन शौचधर्माच्या पाठांत येईल.

थोंडिबा—प्रातःस्मरण आणि स्नान केल्यावर प्रत्येक हिंदूनें आणखी कोणतें धर्मकर्म करावें?

गुरुजी—स्नानानंतर प्रत्येक हिंदूनें संध्या म्हणजे ईश्वरोपासना करावी आणि ती सकाळीं नि संध्याकाळीं करावी. संध्येनें दीर्घायुष्याची प्राप्ति होते. बुद्धिसामर्थ्य वाढतें नि अंतःकरण निर्मळ होतें.

संतोषा—तें कसें?

गुरुजी—संध्येमध्यें परमेश्वराची उपासना आहे. "त्या प्रसवित्या देवाच्या श्रेष्ठ तेजाचें ध्यान करून त्याला सद्बुद्धि दे" अशी प्रार्थना गायत्री मंत्रांत केलेली आहे. म्हणून त्या मंत्राचा जप केल्यानें बुद्धि सामर्थ्य वाढतें.

अमृतलाल—गायत्री मंत्र आम्हांला येत नाही.

रुजी—सांगतों, तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात्. अन्वय—तत् सवितुः देवस्य वरेण्यं भर्गः

धीमहि यो नः धियः प्रचोदयात्. अथ, त्या प्रसवित्या देवाच्या श्रे तेजाचें आम्ही ध्यान करितों तो आमच्या बुद्धींचा प्रेरक होवो (तो आम्हांला सद्बुद्धि देवो.)

वया—हा गायत्रीमंत्र बायकांनीं म्हणावा काय?

गुरुजी—सर्वांनीं म्हणावा. परमेश्वराचें श्रेष्ठ तेज सूर्यामध्यें आहे. सूर्य हा स्थावर, जंगम, स्थिर, चर, चल, अचल जगताचा आत्मा आहे. तो आरोग्यदाता आहे, बुद्धिदाता आहे, म्हणून स्त्रियांनीं, पुरुषांनीं, वृद्धांनीं, तरुणांनीं, ब्राह्मणांनीं, अब्राह्मणांनीं, स्पृश्यांनीं नि अस्पृश्यांनीं, तात्पर्य सर्वांनीं या मंत्राचा जप करावा.

गोविंद—गायत्री मंत्राचा जप किती करावा?

गुरुजी—प्रत्येक हिंदूनें निदान पाच वेळा सकाळीं नि पाच वेळा सायंकाळीं सूर्योदय नि सूर्यास्ताचे वेळीं (संधिकालीं) या मंत्राचा जप केलाच पाहिजे. वेळ असेल तर अठ्ठावीस किंवा अठ्ठेचाळीस अथवा एकशें आठ वेळ मंत्र जपावा. परंतु कांहींही झालें, कसलीही अडचण आली, तरी पाच वेळा गायत्री मंत्राचा जप करण्यास चुकूं नये.

धोंडिबा—मनुष्य प्रवासांत असला किंवा अजारी असला तर त्यानें काय करावें?

गुरुजी—अजारी मनुष्य जर सूर्योदय सूर्यास्ताचे वेळीं शुद्धीवर असेल तर त्यानें सुद्धा हा मंत्र जपावा. प्रवासांत आणि कोणत्याही अडचणींच्या प्रसंगीं उभ्या उभ्या बसल्या बसल्या हा मंत्र जपण्यास फारशी अडचण पडणार नाहीं. स्नान करून शुचिर्भूतपणानें मंत्र जपणें उत्तमच, पण तें न जुळल्यास कोणत्याही

स्थितींत शुद्ध अंतःकरणानें हा मंत्र जपावा.

गंगू—सर्व मंत्रांत गायत्री मंत्र श्रेष्ठ आहे काय?

गुरुजी—होय. वेदांतील सर्व मंत्रांमध्यें हा मंत्र श्रेष्ठ आहे. हाच मंत्र वापरनें अथवा गुरूनें उपनयनाचें वेळीं मुलाला सांगायाचा असतो. सर्व हिंदूंचा मंत्र म्हटला म्हणजे गायत्री मंत्र हा होय. या वेदमंत्रापुढें इतर मंत्रतंत्र, गुरूपदेश आणि असलेच प्रकार हे अगदीं क्षुद्र आहेत. यास्तव या सर्व श्रेष्ठ मंत्राचा जप करावा.

रामनाक—सूर्य हीच सर्वांत श्रेष्ठ देवता आहे काय?

गुरुजी—होय. परमेश्वराचें श्रेष्ठ तेज सूर्यामध्यें आहे म्हणून सर्व हिंदूंची मुख्य देवता सूर्य हीच आहे. ती अनादि कालापासून चालत आलेली आहे. ही देवता ब्रम्हांड व्यापून राहिलेली आहे. सर्व आकाश हें तिचें देवालय. या देवालयांत आपण सर्व हिंदु आहोंत अशा भावनेनें या देवतेची भक्ति करावी.

रामनाक—अन् विठ्ठल, शंकर आणि गणपति या देवांची भक्ति करूं नये काय?

गुरुजी—अरे, हिंदुधर्मांत अनेक देवता आहेत. त्यांतील पुष्कळ देवता निरनिराळ्या पंथांच्या, मतांच्या नि संप्रदायांच्या आहेत. वैष्णवांचा विष्णु, शैवांचा शिव, वारकऱ्यांचा विठोबा असे हे देव आहेत. पण सर्व हिंदूंचा देव म्हटला म्हणजे सूर्य हाच आहे. कोणत्याही मताचे, पंथाचे आणि संप्रदायाचे हिंदु असले तरी त्यांना सूर्य ही देवता मान्य आहे; म्हणून सूर्याची भक्ति केलीच पाहिजे. सारांश सूर्य ही देवता, गायत्री हा मंत्र सर्व हिंदूंचा आहे हें चांगलें लक्ष्यांत ठेवा.

**रामचंद्र**—सूर्याला दररोज नमस्कार घालावेत, असें आमची आजी म्हणते.

**गुरुजी**—बरोबर आहे तुझ्या आजीचें म्हणणें. विद्यार्थ्यांनीं सूर्याची उपासना १०८ साष्टांग नमस्कार घालून करावी. पूर्वी हजार हजार गायत्री जप करणारे व बारा बाराशें नमस्कार घालणारे सूर्योपासक होते. सर्व हिंदूनीं निदान बारा तरी नमस्कार सूर्याला घातलेच पाहिजेत.

**राममाक**—हे बारा नमस्कार कसे घालावेत?

**गुरुजी**—सूर्याचीं बारा नावें आहेत, त्याचा उच्चार करून हे साष्टांग नमस्कार घालावेत. निदान बारा नमस्कार घातल्याशिवाय जेऊं नये. १ मित्रायनम २ रवयेनम ३ सूर्यायनम ४ भानवेनम ५ खगायनमः ६ पूष्णेनम ७ हिरण्यगर्भायनम ८ मरीचयेनम. ९ आदित्यायनम १० सवित्रेनमः ११ अर्कायनम १२ भास्करायनमः—सर्व हिंदूचा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ कोणता हें तुम्हाला ठाऊक आहे काय?

**संतोबा**—आमचे बाबा ज्ञानेश्वरी हा ग्रंथ आहे असें म्हणतात.

**कृष्णा**—आमच्या घरीं एक वेद म्हणणारे गृहस्थ आहेत, ते म्हणतात कीं वेद हा मुख्य ग्रंथ आहे.

**गुरुजी**—हें पाहा, तुम्हा दोघांचें थोडें थोडें बरोबर आहे. वेद हा हिंदुधर्माचा मुख्य ग्रंथ आहे हें खरेंच. पण गीता हें वेदांचें सार आहे वेदांतील नि शास्त्रांतील तत्त्वें गीतेमध्यें फार चांगल्या तऱ्हेनें मांडलेलीं आहेत. गीतेचाच भावार्थ ज्ञानेश्वरीमध्यें सांगितला आहे. म्हणून गीता हाच हिंदूचा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ आहे.

अनेक पंथ, अनेक मतें यांची तोंडमिळवणी गीतेनें केलेली आहे. तुम्हांला थोडें संस्कृत येऊं लागलें म्हणजे मग मी गीता शिकविणार आहें.

**भागीरथी**—संस्कृत येण्यापूर्वी मी गीता वाचली तर चालेल काय?

**गुरुजी**—न चालायला काय झालें? तुला संस्कृत येऊं लागलें म्हणजे अर्थ कळेल. पण न येतां जरी तूं गीता वाचलीस तरी तुझ्या वाणीवर चांगला संस्कार होईल आणि हळू हळू गीता पाठ होईल. संस्कृत येवो वा न येवो, अर्थ समजो वा न समजो, प्रत्येक हिंदूनें गीतेचा दररोज निदान एक तरी श्लोक म्हटलाच पाहिजे. सातशें श्लोकांपैकीं कोणताही एक श्लोक केव्हांही म्हणावा. वेळ असेल त्याप्रमाणें दहा पांच श्लोक, एखादा अध्याय असा म्हणण्याचा परिपाठ ठेवावा. नित्य धर्मकर्मांतील अत्यंत कमी पण अत्यंत आवश्यक भाग सांगितला आहे. आता ईश्वरानें आपणांवर प्रसन्न व्हावें म्हणून त्याचें सर्वांनीं मिळून समुदायानें केव्हां केव्हां नि कसकसें स्तवन करावें हें सांगतों.

**धोंडिबा**—गुरुजी, ईश्वराची प्रार्थना किंवा स्तुति ही दररोज काय म्हणून करावी?

**गुरुजी**—अरे, तुला सांगितलें ना कीं जगचालक ईश्वराचें विस्मरण होऊं नये म्हणून मनुष्यानें त्याचें स्मरण नेहमी करावें. ईश्वर हा सर्व शक्तिमान्, सर्वसाक्षी, सर्वज्ञ, कृपासागर असा आहे. मनुष्य त्यामानानें दुर्बळ, अज्ञ, आणि पंगु असा आहे. मनुष्यानें आपल्या हातून सदैव पुण्य कर्में व्हावींत, पाप कर्माचा संबंधही असूं नये म्हणून वारंवार सद्बुद्धि देण्याबद्दल ईश्वराची करुणा

माकावी. मनुष्याच्या हातून पुष्कळ चुका होतात. मनुष्य कितीतरी अपराध करीत असतो, अपवित्र शब्द मुखावाटें नेहमी येतात, निंदेचें बोलणें कानाना गोड लागतें, या सर्व अहिताच्या गोष्टी होऊ नयेत म्हणून मनुष्यानें अखंड सावध असलें पाहिजे आणि आपला दृढ निश्चय तडीस नेण्याबद्दल वरचेवर ईश्वराचें साहाय्य मागितलें पाहिजे.

मोरेश्वर—आपण जें जें मागावें तें तें ईश्वर देता काय?

गुरुजी—होय. ईश्वर हा सर्वसंपन्न असल्यामुळें तो भक्तावर सर्व दृष्टीनें कृपा करितो. ईश्वराला षड्गुणैश्वर्यसंपन्न म्हणतात. ईश्वराजवळचे हे सहा सद्गुण म्हणजे यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य हे होत. श्रीमंत मनुष्य संतुष्ट झाला की संपत्ति देतो, विद्वान् मनुष्य प्रसन्न झाला कीं विद्या देतो. ईश्वरही प्रसन्न झाला तर त्याच्याजवळ जें जें आहे तें तें सर्व कांहीं आपल्या भक्तांना तो देतो.

रामनाक—ईश्वराच्या भजनाला टाळ मृदंग वगैरे पाहिजेत काय? आमच्या महारवाड्यात टाळ मृदंगाशिवाय कधींच भजन होत नाहीं सकाळीं रामपाऱ्यात मात्र कांहीं महार तोंडानें हरिपाठ म्हणत असतात.

गुरुजी—अरे, भज् धातूचा अर्थ सेवा करणें असा आहे, टाळ, वाणा घेऊन नाचणें असा नाहीं. हल्लीं ज्यारीत जें भजन करितात तें वारकरी पद्धतीचें आहे. मी तुम्हांला वैदिक भजन अथवा स्तवन सांगणार आहें. या भजनाला टाळ, मृदंग, वीणा यांची जरुरी नाहीं.

सुभानागीरी—आपण सांगतां तें वैदिक भजन सर्व हिंदु विद्यार्थ्यांनीं करावयाचें काय?

गुरुजी—होय. सर्व हिंदु विद्यार्थ्यांकरितां तें वैदिक ईशस्तवन आहे. तें सर्वांनीं मिळून करावयाचें आहे. या स्तवनाचा अर्थ तुम्हांला नीट समजला म्हणजे सर्व समाजानें मिळून हें भजन म्हणण्यासारखें कसें आहे हें तुम्हांला समजेल.

पुरुषोत्तम—आपण म्हणतां तसें ईशस्तवन केलें म्हणजे काय होईल?

गुरुजी—परमेश्वर प्रसन्न होऊन आपणांवर कृपा करील. नराचा नारायण, रंकाचा राव, मूर्खाचा शहाणा, भगवत्कृपेमुळेंच होतो. भगवत्कृपा आपल्यावर व्हावी म्हणून सर्वशक्तिमान् दयाघन परमेश्वराला अनन्य भावानें शरण जावें. असो. आतां मी तुम्हांला जें सामुदायिक स्तवन सांगणार आहें त्यांत दोन तीन बारीक भेद आहेत.

गोविंद—ते कोणते?

गुरुजी—पहिल्या मंत्रांत ईश्वराच्या व्यापक आणि सर्व शक्तिमान् स्वरूपाचें वर्णन आहे. दुसऱ्या श्लोकांत आपल्या शरिरांत जो परमेश्वर आहे, ज्याच्या सत्तेनें हस्तपादादि इंद्रियांचे व्यापार व्यवस्थित चालले आहेत, त्याचें माहात्म्य सांगितलें आहे. तिसऱ्या मंत्रात अग्नि, इंद्र नि सूर्य यांच्याजवळ स्मरणशक्ति, विचारशक्ति आणि तेजस्विता हीं मागितलीं आहेत. चौथ्या मंत्रांत गुरुशिष्यामध्यें प्रेम नि ज्ञान यांची वृद्धि व्हावी आणि अध्ययन तेजस्वी असावें अशी प्रार्थना केली आहे. पांच सहा नि सात या तीन मंत्रांत

आपल्या समाजानें शभर वर्षे पर्यंत चागल्या गोष्टी कराव्या, शेंकडों वर्षे आनदानें जगावें, दुसन्याचें दास्य न पतकरता जगावें, विजयी होऊन जगावें, सत्कर्मे करीत करीत जगावें, सर्वांचे सकल्प, सर्वांची हृदयें, सर्वांचे विचार, सर्वांच्या भावना हीं एक असावीं अशी प्रार्थना केली आहे. आठव्या म्हणजे शेवटच्या मत्रात आपल्या राष्ट्राच्या भाग्योदयाची पराकाष्टा व्हावी अशी मागणी केली आहे. या स्तवनामध्यें थोडक्यात स्वतःची, समाजाची नि राष्ट्राची उन्नति व्हावी अशा दर्शनें प्रार्थना केली आहे.

गंगू—स्वत ची, समाजाची आणि राष्ट्राची उन्नति करून देणारें नि कल्याण करणारें तें ईशस्तवन आम्हाला सागा.

गुरुजी—तुम्ही सर्वजण उभे राहा, चित्त एकाग्र करा. हात जोडा नि मी सागतों तसें म्हणा. हें ईशस्तवन एकदा चागलें तुमच्या तोंडीं बसलें म्हणजे मग तुम्हीं स्वत तें दररोज शाळेंत आल्यावर म्हणत जा वर्गास प्रारभ होण्यापूर्वी हें स्तवन सर्वांनीं उभे राहून म्हटलें पाहिजे.

## वेदिक ईशस्तवन.

१ ॐ विश्वतश्चक्षुरुत विश्वतो मुखो विश्वतो बाहुरुत विश्वतस्पात्। सबाहुभ्या धमति सपतत्रैर्द्यावा भूमी जनयन्देव एक ॥ (ऋग्वेद सहिता म. १० । ८१ । ३)

२ योऽन्त प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्ता । सजीवयत्यखिल शक्तिधर स्वधाम्ना ॥ अन्यांश्च हस्तचरणश्रवणत्वगादीन् । प्राणान्नमो भगवते पुरुषाय तुभ्यम् ॥ (भागवत. ध्रुवप्रार्थना.)

३ ॐ मयिमेधां मयि प्रजां मयींद्र इंद्रियं दधातु ।
मयि मेधां मयि प्रजां मय्यग्नि स्तेजो दधातु ।
मयि मेधां मयि प्रजां मयि सूर्यो भ्राजो दधातु ॥
तै. सं. ३ । ३ । १

४ ॐ सहनाववतु । सहनौभुनक्तु । सहवीर्यं करवावहै ।
तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै॥ तै. आ. ८। १

५ ॐ शृणुयाम शरदः शतम् । प्रब्रवाम शरदः शतम् ।
अदीनाः स्याम शरदः शतम् । भूयश्च शरदः शतात् ।

६ ॐ नंदाम शरदः शतम् । मोदाम शरदः शतम् ।
भवाम शरदः शतम् । अजिताः स्याम शरदः शतम् ।
( तै. आ. प्र. ४२ )

७ ॐ समानीव आकूतिः समाना हृदयानि वः । समानमस्तु वो
मनो यथा वः सुसहासति । ऋग्वेद । १० । १९१ । ४

८ ॐ आब्रम्हन् ब्राम्हणो ब्रम्हवर्चसी जायतामास्मिन् राष्ट्रे ।
राजन्य इषव्यः शूरो महारथो जायताम् । दोग्ध्री धेनुः ।
वोढाऽनड्वान् । आशुः सप्तिः पुरंधिर्योषा जिष्णू रथेष्ठा ।
सभेयो युवा । अस्य यजमानस्य वीरो जायताम् । निकामे
निकामे नः पर्जन्यो वर्षतु । फलिन्यो न ओषधयः
पच्यन्तां । योगःक्षेमो नः कल्पतां ॥ ॐ शांतिः शांतिःशांतिः
तै. सं. ७ । ५ ।१८

**रामनाक**—या ईशस्तवनाचा आम्हांला थोडा थोडा अर्थ सांगतां का? तो आम्हाला समजेल का?

**गुरुजी**—अरे, मंत्रांतील अर्थ फारच चांगला असून तो तुम्हांला समजण्यासारखा आहे. अर्थ चांगला समजून घ्या, म्हणजे सर्व मंत्र स्वच्छ पाठ होतील. ऐका आतां मंत्राचा अर्थ.

आपल्या समाजानें शंभर वर्षें पर्यंत चांगल्या गोष्टी कराव्या, शेकडों वर्षें आनंदानें जगावें, दुसऱ्याचें दास्य न पतकरतां जगावें, विजयी होऊन जगावें, सत्कर्में करीत करीत जगावें, सर्वांचे संकल्प, सर्वांचीं हृदयें, सर्वांचे विचार, सर्वांच्या भावना हीं एक असावीं अशी प्रार्थना केली आहे. आठव्या म्हणजे शेवटच्या मंत्रांत आपल्या राष्ट्राच्या भाग्योदयाची पराकाष्ठा व्हावी अशी मागणी केली आहे. या स्तवनामध्यें थोडक्यांत स्वतःची, समाजाची नि राष्ट्राची उन्नति व्हावी अशा दृष्टीनें प्रार्थना केली आहे.

गंगू—स्वतःची, समाजाची आणि राष्ट्राची उन्नति करून देणारें नि कल्याण करणारें तें ईशस्तवन आम्हांला सांगा.

गुरुजी—तुम्ही सर्वजण उभे राहा, चित्त एकाग्र करा. हात जोडा नि मी सांगतों तसें म्हणा. हें ईशस्तवन एकदां चांगलें तुमच्या तोंडीं बसलें म्हणजे मग तुम्हीं स्वतः तें दररोज शाळेंत आल्यावर म्हणत जा. वर्गास प्रारंभ होण्यापूर्वीं हें स्तवन सर्वांनीं उभे राहून म्हटलें पाहिजे.

## वैदिक ईशस्तवन.

१ ॐ विश्वतश्चक्षुरुत विश्वतो मुखो विश्वतो बाहुरुत विश्वत-स्पात्। सम्बाहुभ्यां धमति संपतत्रैर्द्यावा भूमी जनयन्देव एकः॥ ( ऋग्वेद संहिता मं. १० । ८१ । ३ )

२ योऽन्तः प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां । संजीवयत्यखिल शक्तिधरः स्वधाम्ना ॥ अन्यांश्च हस्तचरणश्रवणत्वगादीन् । प्राणा- [illegible] पुरुषाय तुभ्यम् ॥ ( भागव[illegible] ध्रुवप्रार्थना. )

३ ॐ मयिमेधां मयि प्रजां मयींद्र इंद्रियं दधातु ।
मयि मेधां मयि प्रजां मय्यग्नि स्तेजो दधातु ।
मयि मेधां मयि प्रजां मयि सूर्यो भ्राजो दधातु ॥
तै. सं. ३ । ३ । १

४ ॐ सहनाववतु । सहनौभुनक्तु । सहवीर्यं करवावहै ।
तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ तै. आ. ८ । १

५ ॐ शृणुयाम शरदः शतम् । प्रब्रवाम शरदः शतम् ।
अदीनाः स्याम शरदः शतम् । भूयश्च शरदः शतात् ।

६ ॐ नंदाम शरदः शतम् । मोदाम शरदः शतम् ।
भवाम शरदः शतम् । अजिताः स्याम शरदः शतम् ।
( तै. आ. प्र. ४२ )

७ ॐ समानीव आकूतिः समाना हृदयानि वः । समानमस्तु वो
मनो यथा वः सुसहासति । ऋग्वेद । १० । १९१ । ४

८ ॐ आब्रम्हन् ब्राम्हणो ब्रम्हवर्चसी जायतामास्मिन् राष्ट्रे ।
राजन्य इषव्यः शूरो महारथो जायताम् । दोग्ध्री धेनु ।
वोढाऽनड्वान् । आशुः सप्तिः पुरंधिर्योषा जिष्णू रथेष्ठा ।
सभेयो युवा । अस्य यजमानस्य वीरो जायताम् । निकामे
निकामे नः पर्जन्यो वर्षतु । फलिन्यो न ओषधयः
पच्यन्तां । योगःक्षेमो नः कल्पता ॥ ॐ शांतिः शांतिःशांतिः
तै. स. ७ । ५ ।१८

**रामनाक**—या ईशस्तवनाचा आम्हांला थोडा थोडा अर्थ सांगतां का ? तो आम्हाला समजेल का ?

**गुरुजी**—अरे, मंत्रातील अर्थ फारच चांगला असून तो तुम्हाला समजण्यासारखा आहे. अर्थ चांगला समजून घ्या, म्हणजे सर्व [illegible] पाठ हो[illegible] ऐका आता मंत्राचा अर्थ

१ ज्या परमेश्वराला सगळीकडून डोळे, तोंड, हातपाय आहेत, (अर्थात् आपण कोणास न कळत काम केलें तरी तो ईश्वर तें काम पाहतोच ) जो बाहू पासून स्वर्ग आणि पायापासून पृथिवी उत्पन्न करितो, तो स्वर्ग, पृथिवी इत्यादि सर्व जग, उत्पन्न करणारा परमात्मा एकच आहे.

२ सर्व शक्ति संपन्न असा जो परमेश्वर माझ्या हृदयात प्रवेश करून जड अशा वाणीला आणि हात, पाय, कान, त्वचा नि प्राण इत्यादिकाना प्रेरणा देतो, त्या भगवताला माझा नमस्कार असो.

३ भगवान् इंद्र मला स्मरण शक्ति, मुलेंबाळें आणि इंद्रिय-सामर्थ्य देवो.

भगवान् अग्नि मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें आणि विचार-शक्ति देवो.

भगवान् सूर्य मला स्मरण शक्ति, मुलेंबाळें आणि तेजस्विता देवो.

४ परमात्मन्! आम्हा गुरु शिष्याचें रक्षण कर। दोघांसही ऐश्वर्य दे। दोघाकडूनही मोठ पराक्रम होऊ देत आमचें ज्ञान तेजस्वि राहावें। आणि आमच्या मध्ये नित्य प्रेमभाव राहो।

५ शंभर वर्षांच्या आयुष्यांत जगापासून आम्हांस ज्ञान प्राप्त होवो

शंभर वर्षांच्या आयुष्यात आम्ही जगाला ज्ञान देत राहावें. शंभर वर्षांच्या आयुष्यात आम्हाला कधीं दैन्य प्राप्त न व्हावें. किं-बहुना शंभर वर्षांपक्षां अधिक आयुष्य मिळून स्यात अशाच गोष्टी व्हाव्या.

६ शंभर वर्षांच्या आयुष्यांत आम्हांस ऐश्वर्य मिळत असावें.

शंभर वर्षांच्या आयुष्यांत आम्हांस सुख मिळत असावें. शंभर वर्षांच्या आयुष्यांत आप्त, इष्ट, पुत्र, पौत्र यांची समृद्धि व्हावी.

शंभर वर्षांच्या आयुष्यांत आम्ही सर्वांपेक्षां सर्व गुणांत वरचढ व्हावें.

७ परमेश्वराची आज्ञा आहे कीं तुम्हां सर्वांचे विचार, बुद्धि आणि मन, एक सूत्री राहूं देत. त्यामुळें तुमचा समाज एकजीव होऊन ऐश्वर्यमान् होईल.

८ परमात्मन्, या राष्ट्रांत ब्राम्हण तेजस्वी आणि विद्वान् होवोत; क्षत्रिय अचूक नेम मारणारे, धाडसी आणि युद्धकुशल होवोत; गाई दुधाळ, बैल बळकट, घोडे चपळ, स्त्रिया पावित्र्याचा धडा देणाऱ्या ( स्त्रिया पतिव्रता ) आणि समाज स्थापक, लढवय्ये जयिष्णु तरुण आपल्या विद्वत्तेची नि वक्तृत्वाची सभेवर छाप पाडणारे असे होवोत. नागरिकाना सत्पुत्र होवोत, योग्य वेळीं पाऊस पडो, शेतें उत्तम पिकूं देत आणि आमच्या राष्ट्राचा योगक्षेम उत्तम चालूं दे.

ॐ शांतिः शांतिः शांतिः ही शांति प्रत्येक मंत्राचे शेवटीं म्हणावी. हिचा अर्थ सर्वत्र शांतता असावी, समाधान असावें, आणि स्वास्थ्य असावें असा आहे.

**प्रेमचंद**—वाः ! या मंत्रात फार चांगला अर्थ भरलेला आहे. आम्हांला आमच्या लोकाना जें जें काहीं पाहिजे तें तें सर्व या मंत्रामध्यें आहे. आम्ही हा अर्थ लक्षात ठेवून दररोज ईशस्तवन करूं.

**गुरुजी**— मुलानो, आपल्या वेदामध्यें पुष्कळ तेजस्वी मंत्र आहेत. त्यांतील एक नमुना म्हणून मी तुम्हांला हे थोडे मंत्र सांगितले आहेत, तुम्ही मोठे झाला आणि वेदाचा अधिक अधिक अभ्यास

करूं त्याला म्हणजे तुम्हाला आपल्या वैदिक वाङ्मयाचें आणि त्यातील तेजस्वी मंत्राचें रहस्य समजेल. सर्व हिंदूंनीं गावात दररोज एका ठिकाणीं जमून म्हणण्यासारखे हे ईशस्तवनपर मंत्र आहेत. कोणत्याही सार्वजनिक कार्यारंभीं, समुदायाच्या प्रसंगीं हें स्तवन सर्व हिंदु स्त्रीपुरुषानीं उभे राहून म्हणावें. सभा, समारंभ, उत्सव अशा निरनिराळ्या वेळीं सर्व हिंदु स्त्रीपुरुष एकत्र जमतात, तेव्हां त्यानीं वैदिक ईशस्तवनाची संधी दवडू नये. विद्यार्थ्यांनो, तुमचीं नित्याचीं धर्मकर्में अगदीं वेळेवर करीत चला. कोणतीही गोष्ट अगदीं वेळेवर करण्यात अर्थ आहे. प्रत्येक हिंदु व्यक्तीनें आपलें नित्य धर्मकर्म विनचुक आणि वेळेवर करण्याचा निश्चय केला पाहिजे. काहीं धर्मकर्में व्यक्तीनें नि काहीं समाजानें करावयाचीं असलीं तरी तींही बरोबर वेळच्या वेळीं झालींच पाहिजेत. वेळचे वेळीं धर्मकर्में केलीं तर त्यामुळें आचार सामर्थ्य वाढेल. शिवाय नियमितपणा, दृढनिश्चय, निग्रह हे सद्गुण वाढण्याला पुष्कळ उपयोग होईल. असो. उद्यां पासून शाळेंत आल्याबरोबर वेळच्यावेळीं मीच तुम्हा कडून हें वैदिक ईशस्तवन म्हणवून घेईन.

---

## पाठ पांचवा.

### न मातुः परदैवतम्

गुरुजी—मुलांनो, आईच्या सांगण्याप्रमाणें वागणें, तिची आज्ञा न मोडणें नि तिला सुख देणें हें तुमचें दुसरें कर्तव्य आहे. या

जगात तुमच्यावर सर्वांत अधिक प्रेम जर कोणी करीत असेल तर ती आईच करते.

संतोषा—परमेश्वर असंत कृपाळु आहे, तो दयासागर आहे, त्याची सर्वांवर कृपा आहे असें आपण पूर्वी सांगितलें आणि आतां आईचें प्रेम अधिक असतें असं म्हणतां हें कसें ?

गुरुजी—शाबास ! तुझी स्मरण शक्ति चांगली आहे. या जगात जीं माणसें आपल्यावर ममता करितात त्यांत आईच्या ममतेची तोड दुसऱ्या कोणाला नाहीं असाच माझ्या म्हणण्याचा आशय होता. जगच्चालक परमेश्वराचें जगतांतील प्राण्यावर अलोट प्रेम आहे म्हणूनच जग चाललें आहे. त्या कृपाळु परमेश्वराच्या प्रेमाची गोष्ट सोडून दिली तर या दृश्य जगांत आईचेंच प्रेम सर्वांत मोठें ठरणार आहे.

दया—गुरुजी, वडिलांचें, भावाचें नि मित्राचें प्रेम कांहीं कमी असतें का ! एकमेक मित्र तर प्रसंगीं जिवलगा करिता प्राण देण्यास तयार होतात. मग आईचेंच प्रेम या जगात मोठें असें कसें म्हणता ?

गुरुजी—मुली तुला जगाचा अनुभव नाहीं. मित्राचें प्रेम, बापाचें प्रेम, भावंडांचें प्रेम हें कांहीं कमी असतें असें नाहीं. पण सगळ्यांत आईच्या प्रेमाची थोरवी विशेष आहे. समर्थांनीं दासबोधात मातेबद्दल एक सुरेख कल्पना सांगितली आहे.

चंपावती—गुरुजी, काय बरें ती कल्पना ?

गुरुजी—परमेश्वरानें प्राणिमात्राला निर्माण केलें तेव्हां या देहधारी प्राण्याचें संरक्षण कसें करावें अशीं त्याला काळजी

पडली. जगाच्या पोषणा करितां ईश्वरानें स्वतःला आईच्या स्वरूपानें विभागून घेतलें आणि ती काळजी दूर केली. प्रत्येक प्राण्याच्या संरक्षणाला एकेक आई मिळाल्या बरोबर सृष्टीची वाढ होऊं लागली. तात्पर्य, माता ही ईश्वराच्या कृपेची प्रत्यक्ष मूर्ति आहे. माता नसती तर जग चाललें नसतें. जिकडे तिकडे आया आहेत आणि जगाची आई परमेश्वर आहे म्हणूनच हें ब्रह्मांड चाललें आहे.

अमृतलाल—श्रीसमर्थाच्या त्या ओव्या आपण सांगाल काय?

गुरुजी—होय. मी तुम्हांला ओव्यांतली कल्पना सांगितली. आतां ओव्या सांगतों; त्या फार छान आहेत. पाठ करून टाका.

दासबोध दशक २० समास ४.

पृथ्वीमध्यें जितुकीं शरीरें । तितुकीं भगवंताचीं घरें ।
नानासुखें येणें द्वारें । प्राप्त होतीं ॥ १ ॥
त्याचा महिमा कळेल कोणाला । माता वाटून कृपाळू जाला ।
प्रत्यक्ष जगदीश जगाला । रक्षितसे ॥ २ ॥

गोपाळ—ईश्वराच्या खालोखाल या जगात आईचेंच प्रेम आहे नि त्यामुळे आपण जगतों, हें जर खरें, तर मग आई मेलेल्या मुलाचें काय होतें?

गुरुजी—ज्या हतभागी मुलांची त्याच्या लहानपणीं आई मरते तीं दुर्दैवीच समजलीं पाहिजेत. अशा मुलाचें संगोपन चांगल्या तऱ्हेनें होत नाहीं. जें थोडेबहुत होतें, तें ईश्वर आईसारखी माया करणारीं कोणी तरी माणसें उभी करितो त्यामुळें होतें. पण मातेच्या शुद्ध आणि सात्विक प्रेमाची त्या माणसाच्या प्रेमाला कधींच सर येत नाहीं. जीं माणसें नास्तिक असतील, ज्यांना ईश्वराच्या कृपेची

कल्पना करवत नसेल, त्यांनीं मातेच्या शुद्ध प्रेमावरून तरी ईश्वराच्या प्रेमाची कल्पना करावी.

चया—गुरुजी, आईच्या प्रेमाची आम्हांला कल्पना यावी म्हणून ती आमच्या करितां काय काय करिते एवढें सांगा बरे!

गुरुजी—मूल जन्मास येण्यापूर्वीपासून म्हणजे तुम्ही आम्ही आईच्या पोटांत असतों तेव्हां पासून, ती आपल्या करितां काळजी घेते. ल्हानपणीं तुम्हांला खोकला होऊं नये, ताप येऊं नये, कोणत्याही प्रकारची थंडी वाऱ्याची इजा होऊं नये, म्हणून आईला अगदीं पथ्यानें राहावें लागतें. ल्हानपणीं तुमचें आईच्या अंगच्या दुधावर पोषण होतें, म्हणून आईला आपलें खाणेंपिणें फार नेमस्त ठेवावें लागतें. ल्हानपणचीं तुमचीं दुखणीं, पोटांतले रोग, गोंवर, दांत येत असतांना होत असलेली हगवण हीं सर्व काढतां काढतां नि तुमची जोपासना करतां करतां आईला किती त्रास होतो याची तुम्हांला कल्पना नाहीं. समर्थ म्हणतात 'वीट नाहीं कंटाळा नाहीं। आलस्य नाहीं त्रास नाहीं। ऐसि माया कोठेंचि नाहीं। माते वेगळी॥ १॥ ल्हानपणीं कांहीं समजत नसतें, कांहीं मुलें तर फारच रडवीं असतात, अशा वेळीं रात्रींच्या रात्रीं जागरणे करून, अंगाखांद्यावर खेळवून, इकडे ठेवून, तिकडे फिरवून, पाळण्यांत घालून गाणीं म्हणून बाळाला सुख होण्याकरिता आई काय काय करिते हें लक्षांत आणा.

शांतशील—गुरुजी, इतका त्रास आई कसा बरें सोसते?

गुरुजी—आईच्या अंतःकरणांत ईश्वराच्या प्रेमाचा संचार होतो आणि तें प्रेमच त्या आईरूपी बाहुलीला कळसूत्री बाहुल्या प्रमाणें

नाचविते. ल्हानपणीं मुलाला काय होतें, त्याला भूक केव्हां ला
हें सर्व आईला कळतें. चालण्याची इच्छा मुलानें दर्शविली
आई त्याच्या हातांत बोट देऊन त्याला चालायला शिकविते. मुला
कंठ फुटला नि तें कांहीं तरी शब्द करूं लागलें कीं आई त्या
बोलायला शिकविते. मुलाचें अंग मळलें कीं आई तें लुगड्य
पुसून स्वच्छ करिते. मूल उघडेंवाघडें हिंडूं लागलें कीं आई
थंडी वाजते आणि ती लगेच त्याला अंगडें टोपडें घालते. मूल र
लागलें कीं आईचें अंतःकरण भडभडूं लागतें. मूल कोठून पड
कळवळलें कीं इकडे आईचेंही अंतःकरण कळवळतें. समर्थांनीं एव
स्फुट प्रकरणामध्यें आईचें वर्णन फार चांगलें केलें आहे:

कृष्णा—सांगा, सांगा, तें वर्णन कसें आहे तें.

गुरुजी—बाळका वाढवी माता । जेथें तेथें परोपरी ।
स्वभावें जीविचें जाणे । अंतरीं निवरे सदा ॥ १ ॥
बाळका बोलतां येना । हित तेंहीं कळेचिना ।
हेकाड बावळें वेडें । मातेला प्रिय होतसे ॥ २ ॥
आन्याई अवगुणी खोडी । कुश्चीळ रडतें सदा ।
अंतर्सें माय लोभाळु । लोभें गुणासी वाढवी ॥ ३ ॥
नागिवें उघडें लोळे । ह्मागे वोकी आन्हासन्हा ।
तैशास नेटकें दावी । लेववी नेसवी सदा ॥ ४ ॥
मातेचा कळवळा मोटा । लोभासी तुळणा नसे ।
आळसेना विसंबेना । कंटाळेना कदापिही ॥ ५ ॥

या कवितेवरून आईच्या शुद्ध प्रेमाची तुम्हाला कल्पना येईल.

मोरेश्वर—ल्हानपणींच आईचें प्रेम मुलावर असतें काय ?

गुरुजी—छेः छेः! कांहीं तरी बोलतोस. लहानपणीं कुरुप, घाणेरडें, शेंबडें, मेकडें, कसलेंहि मूल असलें तथापि तें आईला प्रिय असतें. मोठेपणींही आई मुलावर प्रेम करिते. मुलगा श्रीमंत असो, गरीब असो, आईचें प्रेम हें तिळमात्रही कमी होत नाहीं. आई कितीही दरिद्री असली तरी वाटेल तें करून मुलगा अगदीं दगड असला तरी तीं त्यास जेऊं घालते. मुलाला दुःख झालें कीं आईच्या नेत्रांतून अश्रु येऊं लागतात. तुम्हांला मोठेपणी जीं सांसारिक दुःखें सोसावीं लागतात, त्यावेळीं आईचें अंतःकरण तुमच्या करितां तिळ तिळ तुटत असतें. जन्माला येण्यापूर्वीपासून आई जी तुम्हांला जपते ती तिचा जिवात जीव असेपर्यंत जपतच असते. आईच्या प्रेमाची पाखर ज्याच्यावर सदैव असते तो मोठा भाग्यवान् समजला पाहिजे. आईच्या या निरपेक्ष प्रेमाची, तिनें सहन केलेल्या त्रासाची फेड आपण कांहीं केलें तरी होत नाहीं. म्हणून वेदाची आज्ञा तुम्हांला 'मातृदेवो भव' आईला देव माना अशी आहे. मातेच्या ऋणांतून मुक्त होणें कठीण आहे. म्हणून निदान तिला दुःख तरी देऊं नका, तिला त्रास देऊं नका. आईला जर दुःख दिलें तर ईश्वर तुमच्यावर कोपेल.

गंगू—मला आजपर्यंत आईच्या प्रेमाची कल्पना नव्हती म्हणून तिची मला किंमत नव्हती. पण यापुढें मी अगदीं आईच्या सांगण्याप्रमाणें वागेन. आजपर्यंत मीं आईला त्रास दिला, विनाकारण हट्ट घेतला, छांदिष्टपणानें तिच्या इच्छेच्या उलट वर्तन केलें याबद्दल मला फार वाईट वाटते.

गुरुजी—मुलांनो, आईच्या प्रेमाची किंमत तुम्हांला कळली

म्हणजे तुम्हांपैकीं प्रत्येकाला आजपर्यंतच्या वर्तनाबद्दल पश्चातापच वाटला पाहिजे. यापुढें आपलें वर्तन सुधारा. लहानपणीं शिक्षणाच्या दृष्टीनें आपणाला आईची किती मदत होते हें तुम्ही कोणी सांगाल काय?

**गोदावरी**—आम्हाला तें सांगता येत नाहीं. आपणच सांगा.

**गुरुजी**—पिता नि गुरु यांचा लहानपणीं शिक्षणाच्या दृष्टीनें कांहीं उपयोग होत नाहीं. आईचें प्रेमळ अंतःकरण हेंच मुलाच्या कोमल अंतःकरणाच्या शिक्षणाला अधिक उपयोगी पडतें. आईच्या प्रेमाच्या प्रभावानें अनेक व्यवहार करितां करितां मुलाला जें शिक्षण मिळतें तें फार महत्त्वाचें असतें. मोरोपंत म्हणतात— स्तन पाजितां निजवितां हालवितां बाळकासि खेळवितां। दे बोध जो सुदुर्लभ थोरांसि सहस्र कल्प मेळवितां ॥ १ ॥ या आर्येंत सांगितलेला व्यवहार जेव्हां माता करिते, त्यावेळीं तिच्या अंतःकरणांत ज्या ज्या मनोवृत्ति असतात, त्या सर्वांचा संस्कार मुलावर होत असतो. सुसंस्कृत आणि सुबुद्ध आईपासून लहानपणीं मुलाला जो बोध मिळविण्याला थोरांना पुष्कळ काळ लागतो असें जें आर्येंत म्हटलें आहे तें बरोबर आहे. लहानपणीं आई जसें चालायला बोलायला शिकवीत असते, तसेंच ती खरें काय, खोटें काय, पाप काय, पुण्य काय, यांचेंही शिक्षण देते. म्हणूनच पिता किंवा शिक्षक यांच्यापेक्षां आईची योग्यता बाळपणीं शिक्षण देण्याच्या दृष्टीनें मोठी ठरविली आहे.

**रामनाथ**—आपले वडील नि शिक्षक हे आपल्याला शिक्षण देतात. ठिकठिकाणच्या शाळांत आतां शिक्षण देतांना आम्हीं धर्माचेंही

पाहिलें नाहीं. मग आईचें शिक्षण सर्वांत चांगलें असें कसें म्हणतां येईल!

गुरुजी—अरे, आई ही मोठी शिक्षण शास्त्रज्ञ असते आणि तिला फार चांगलें शिकवितां येतें असा माझ्या म्हणण्याचा आशय नाहीं. लहानपणीं शिक्षकानें एक गोष्ट शंभर वेळां सांगितली आणि बापानें दाहावेळां सांगितली, पण तीच गोष्ट आईनें एक वेळ सांगितली तर आईच्या सांगण्याचा ठसा जो मुलाच्या मनावर उठतो तो कांहीं बापाच्या किंवा शिक्षकाच्या सांगण्याचा उठत नाहीं. इतिहासांतील सुप्रसिद्ध शिवाजी महाराजांचेंच उदाहरण घ्या. जिजाई मातुःश्रींच्याच शिक्षणाचा शिवाजी महाराजांना उपयोग झाला नाहीं काय?

धोंडिबा—जिजाईचें शिवाजीवर अत्यंत प्रेम होतें. लहानपणापासून शिवाजीला आईचाच लळा होता. आईच्या जवळच शिवाजी महाराजांचें बालपण गेलें. भारत रामायणांतील गोष्टी सांगून तिनेंच शिवाजी महाराजांना, स्वधर्म आणि स्वदेश या करितां झटण्यास सांगितलें.

गुरुजी—बरोबर बोललास. तीनशें वर्षांपूर्वी ज्या नरवीरानें हिंदवी स्वराज्याची स्थापना केली त्यास जर लहानपणीं जिजाई मातुःश्रींचें शिक्षण मिळालें नसतें तर कांहीं निराळेंच दिसलें असतें. शिवाजीच्या मोठेपणाला, उद्योगाला, कर्तृत्वाला जिजाईचें शिक्षण, उत्तेजन नि उपदेश हीं कारणीभूत झालीं. प्रौढपणीं सुद्धा शिवाजीला योग्यवेळीं जिजाबाईच्या विचारापासून लाभ झालेला आहे. शिवाजी प्रमाणेंच नेपोलिअन बादशाहाची गोष्ट आहे.

भागीरथी—नेपोलिअन हा कुठला नि कोण? त्याची काय हकीकत आहे!

गुरुजी—नेपोलिअन हा फ्रान्सचा बादशहा. तो नेहमी असें म्हणे कीं माझ्या मोठेपणाला माझी आईच कारणीभूत झालेली आहे. ल्हानपणीं आईपासून मला जें सुशिक्षण मिळालें तें जर मिळालें नसतें तर मी कदाचित् सामान्य मनुष्यच राहिलों असतों. ल्हानपणीं मातेच्या शिक्षणाचा संस्कार कसा होतो आणि सुसंस्कृत मातेनें मनावर केलेले सस्कार कसे दृढ राहतात, हें या उदाहरणावरून तुमच्या लक्षात येईल. ध्रुवाच्या सुनीति नामक मातेचीही अशीच गोष्ट आहे.

वसंत—ध्रुव भर सभेंत पित्याच्या मांडीवर बसावयाला गेला नि तिथें त्याचा अपमान झाला तीच का गोष्ट?

गुरुजी—अरे अपमान झाला ही गोष्ट कसली? ध्रुव रडत घरीं आल्यावर त्याच्या आईनें त्याला जो उपदेश केला तें त्या गोष्टीचें सार आहे. सुनीति म्हणाली, "बाळा ध्रुवा, तू मानधन आहेस. मानी क्षत्रियानें अपमान कधींही सोसता कामा नये. तूं नि शस्त्र, दुर्बल असहाय्य, पगु असलास तरी शूर मनुष्याला शोभेल अशा तऱ्हेचें वर्तन करून तू अपमानाचा सूड घे. मानानेंच चार दिवस जगावें, मानाचीच मीठ भाकर चागली असते. तुला आता ईश्वरावाचून दुसरा कोणी त्राता नाहीं, हें पक्कें समज." मुलानो, या भाषणानें ध्रुव तडक वनाकडे गेला आणि त्यानें ईश्वराला प्रसन्न करून घेतलें. जिजाई, सुनीति यांच्या प्रमाणेंच विदुला कुंती या भारतमातानीं आपल्या कर्तव्यविन्मुख झालेल्या मुलाना

वेळोवेळीं उपदेश करून स्वकर्तव्य करावयास लाविलें, महाभारतांत अशा पुष्कळ गोष्टी आहेत. कुंती नि विदुला याप्रमाणें हिंदुस्थानात शेंकडों भारतमाता होऊन गेल्या. अलीकडच्या इतिहासांत राजपुतान्यांतील वीर मातांचीं नि मराठ्यांच्या वीर मातांचीं कितीतरी उज्वल उदाहरणें सांगतां येण्यासारखीं आहेत. तुम्ही तीं इतिहासाच्या गुरुजींकडून समजून घ्या. माता ही श्रेष्ठ कशी आहे, माता हेंच श्रेष्ठ दैवत म्हणण्याचें कारण काय, हें समजलेंना ?

मुलें—समजलें, समजलें.

गुरुजी—अरे, तुम्हाला पुष्कळ गोष्टी समजतात पण उमजत नाहींत. कळतात पण वळत नाहींत. मातेची थोरवी नेहमी लक्षांत ठेवून सकाळीं उठल्या बरोबर दररोज तिला नमस्कार करीत जा. ' मातुश्री, मी कृष्णा आपल्याला नमस्कार करतों. ' मी रामा, मी गोविंदा, असा आपल्या नावाचा उच्चार करून नमस्कार करणें यालाच शास्त्रात अभिवादन असें म्हटलें आहे. उद्यापासून मातेला श्रद्धेनें नमस्कार करीत जा. तिच्या आज्ञेबाहेर वागूं नका. तिला दुःख देऊं नका. तप्त झालेल्या मनुष्याला मातेसारखी सावली नाहीं. लहानपणीं मातेसारखा रक्षक नाहीं. दुःखानें पीडित झालेल्या मनुष्याचें माता हेंच सुखसाधन आहे. माता असली कीं मनुष्य सनाथ होतो नि गेली कीं अनाथ होतो. कोणत्याही स्थितींतून मनुष्य घरीं आला तर आई म्हणताच सुखाचा वर्षाव करणारी माताच होय. साराश, ईश्वराच्या कृपेचा प्रतिनिधि म्हणून असलेली जी माता तिची योग्यता कोठवर वर्णावी ?

# पांचव्या पाठाची पुरवणी.

## वेद

ॐ यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः उशतीरिव मातः
मातृदेवो भव ( उपनिषत् ) । न मातुः परदैवतं ।

मनुस्मृति अध्याय २ । १४५

उपाध्यायान्दशाचार्यः । आचार्याणां शतं पिता ।
सहस्रं तु पितॄन् माता । गौरवेणातिरिच्यते ॥

याज्ञवल्क्यस्मृति, आचाराध्याय, ब्रह्मचारिप्रकरण

एकदेशमुपाध्यायः । ऋत्विग्यज्ञकृदुच्यते ।
एते मान्या यथापूर्वम् । एभ्यो माता गरीयसी ॥

महाभारत, शांतिपर्व अध्याय २७२

समर्थं वाऽसमर्थं वा । कृशं वाऽप्यकृशं तथा
रक्षत्येव सुतं माता । नान्यः पोष्टा विधानतः ॥ २८ ॥
पुत्रपौत्रोपपन्नोऽपि । जननीं यः समाश्रितः
अपि वर्षशतस्यान्ते । स द्विहायनवच्चरेत् ॥ २९ ॥
तदा स वृद्धो भवति । तदा भवति दुःखितः
तदा शून्यं जगत्तस्य । यदा मात्रा वियुज्यते ॥ ३० ॥
नास्ति मातृसमा च्छाया । नास्ति मातृसमा गतिः
नास्ति मातृसमं त्राणं । नास्ति मातृसमा प्रिया ॥ ३१ ॥
कुक्षौ सन्धारणाद्धात्री । जननाज्जननी स्मृता
अङ्गाना वर्धनादम्बा । वीरसूत्वेन वीरसूः ॥ ३२ ॥

ज्ञानेश्वरी

जे अपत्य थानीं निगे । तयाची भूक ते मातेसीच लागे
येन्हवीं तें शद्बें काय सागे । मग स्तन्य दे येरी ॥ अ. ८, १३
नातरी बाळक बोबडा बोलीं । बाकुडा विचुका पाउलीं
ते चौज करून माउली । रिझे जेवीं ॥ अ. ९ ओ. ६
जैसे बाळका लेयविजे लेणें । तयाप्रमाणें बाळ काई जाणे ।
परी ते सुखाचे सोंहळे भोगणे । माउलियेचि दिठीं ॥ १० । ९८

मोरोपंत केका । ९५

पिता जरि विटे विटो न जननी कुपुत्रीं विटे
दयामृतरसार्द्रधी न कुलकज्जलें त्या किटे
प्रसादपट झांकिती, परि परा गुरूचे थिटे
म्हणूनि म्हणती भले ' न ऋण जन्मदेचें फिटे ॥

तुकाराम

तुका म्हणे बाळ माते पुढें नाचे । बोल आणिकांचे नावडती ।

---

## पाठ सहावा.

### माता, पिता, आणि गुरु.

गुरुजी---आज तुम्हाला पित्याची योग्यता काय आहे, गुरूची महती किती आहे, हें मी सागणार आहें. पुरुषोत्तम, वडिलाची भक्ति का करावी? त्याच्या सागण्याप्रमाणें का चालावें, साग बरें!

पुरुषोत्तम.—वडिलांनीं मिळवून आणिलें तरच आई स्वैपाक

करून जेवावयास घालिते. अन्नवस्त्र वडीलच आपल्याला देतात, मातेप्रमाणें पित्याचीही कृपा आपल्यावर असावी लागते, म्हणजेच आपलें संरक्षण होतें.

**गुरुजी**—मुलगा आणि मुलगी हीं प्रौढ झालीं, कीं त्यांच्या शिक्षणाची आणि आरोग्याची काळजी आईबापांना लागते. जगांतला व्यवहार, संसारांतलें सुख आणि प्रसंग, हे सर्व पित्याच्या शिक्षणामुळेंच समजतात. पित्याला पुत्रापासून फक्त प्रेम मिळतें. पण पुत्राला सर्व काहीं पित्यापासून मिळतें. निरनिराळे खाण्याचे पदार्थ, उपभोगाचे पदार्थ, धर्मशिक्षण, नीतिशिक्षण आणि लौकिक शिक्षण हें सगळें पित्यापासूनच मिळतें. म्हणून पित्याच्या *आज्ञेप्रमाणें वागून त्याचें प्रेम संपादून त्याचा आशीर्वाद घेणें हें* तुमचें कर्तव्य आहे.

*अमृतलाल*—आईप्रमाणेंच बापाच्या आज्ञेंत वागलें पाहिजे ना!

**गुरुजी**—होय, तुमच्या वयाच्या आठ दहा वर्षांपासून आईबापाचें तुमच्यावर सारखेंच प्रेम असतें. आईप्रमाणेंच बापालाही तुमच्याकरिता श्रम पडतात. त्याला थोडेथोडके श्रम होतात असें समजू नका. मुलाबाळाच्या अन्नवस्त्राकरिता, त्यांच्या हिताकरिता, बापाला फार काबाडकष्ट सोसावे लागतात. चाकरी नोकरीच्या पायीं ऊन ना तहान, गाव ना घर अशा स्थितींत बापाला रानोरान, गावोगाव, देशोदेश हिंडावें लागतें. स्वतःच्या पोटास पुरेसें न खाता वडील आपल्या तोंडचा घास मुलाकरिता ठेवितात. स्वतः फाटकें तुटकें वस्त्र वापरून बाप मुलाना चांगलें वस्त्र देतो. स्वतः शिळेंकोरडें खाऊन मुलाच्या मुखात बाप सुग्रास अन्न पडेल अशी

व्यवस्था करितो. लहानपणीं तुम्हांला समजत नसतें आणि बापाचा संबंध कमी येतो. परंतु जों जों समजूं लागतें तों तों आपणास बापाच्या उपकारांची कल्पना येऊं लागते. आईप्रमाणेंच पित्यालाही देव माना आणि उभयतांची सेवा करून आपलें कल्याण करून घ्या.

**वत्सा**—आईबापांची सेवा कशी करावयाची नि त्या सेवेनें काय काय मिळतें ?

**गुरुजी**—आईबापांची सेवा करणें म्हणजे त्यांच्या आज्ञेंत वागणें हें तुमचें कर्तव्य आहे. तुम्ही जन्मास आल्यापासून मातापितरांना जे जे क्लेश सोसावे लागले असतील त्यांचे उतराई होणें हें तुमचें कर्तव्य आहे. आईबाप हे केव्हाही आपला हिताचा आणि कल्याणाचा मार्ग सांगतात, हें लक्षात ठेवून त्याना सर्वतोपरी सुख देण्याबद्दल झटणें हीच त्यांची खरी सेवा होय. तुम्हांला समजूं लागल्या पासून तुम्ही आईबापाच्या मनाला वाईट न वाटेल अशी वर्तणूक ठेवा. वृद्धपणीं आईबापाची सेवा तुम्ही त्याना परमेश्वर समजून केली पाहिजे. अशी सेवा ईश्वरप्राप्तीचें साधन होतें.

**रंगनाथ**—आईबापाची सेवा हें ईश्वरप्राप्तीचें कसें साधन होतें ?

**गुरुजी**—अरे, पुंडलिकाची गोष्ट तुम्हाला ठाऊक नाहीं काय ? पुंडलिकाकरिता प्रत्यक्ष पांडुरंग पंढरीस येऊन उभा राहिला. पुंडलिकानें जी आईबापाची सेवा केली त्या सेवेवर भगवान् संतुष्ट झाले नि त्यानीं 'पुंडलीक वरदा हरि विठ्ठल' असें स्वतःला म्हणवून घेतलें. पुंडलिकाप्रमाणेच श्रावण या नावाच्या एका ब्राह्मणानें

आईबापाची अशीच उत्कृष्ट सेवा केली आणि उत्तम लोक प्राप्त करून घेतला.

कृष्णा—आणखी कोणाची गोष्ट असेल तर सांगा.

गुरुजी—महाभारतांत वनपर्वामध्यें धर्मव्याधाची एक मजेदार गोष्ट आहे ती तुम्हाला सांगतों. कौशिक या नावाचा एक तपस्वी ब्राह्मण होता. त्याला आपल्या तपश्चर्येची मोठी घमेंडी होती. एकदां एका पतिव्रतेची नि त्याची गाठ पडली. तिनें त्याची फजिती उडविली आणि मिथिला नगरींतील धर्मव्याधाकडे जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो ब्राह्मण त्या धर्मव्याधाकडे गेला. त्या ब्राह्मणानें धर्म, नीति, तत्त्वज्ञान अशा विविध विषयांवर त्या व्याधाला पुष्कळ प्रश्न विचारिले. धर्मव्याधानें सर्व प्रश्नांचीं बरोबर उत्तरें दिल्यावर ब्राह्मण आश्चर्यचकित झाला नि म्हणाला ' बाबा, तुझ्या या ज्ञानाला तुझा धंदा शोभत नाहीं.' धर्मव्याध म्हणाला, 'ज्यांच्या कृपेमुळें मी प्रत्यक्ष न्यायास अनुसरून वागत आहें तों माझा प्रत्यक्ष धर्म म्हणजे माझे आईबाप होत. आपण माझ्या प्रत्यक्ष धर्माला म्हणजे आईबापांना पाहा. हे ब्राह्मणा, मला आईबापाशिवाय दुसरें कांहीं प्रिय नाहीं. मी निरंतर त्यांची सेवा करीत असतों. मी आईबापाच्या सेवेकरितां मित्रवर्ग, पुत्र, भार्या, फार काय पण पंचप्राण अर्पण केलेले आहेत. त्यांनीं मला कसलीही अप्रिय गोष्ट सांगितली तरी ती मी आनंदानें करीत असतों. माझ्या ठिकाणीं जें ज्ञान आहे, जे सद्गुण आहेत, ते आईबापाच्या तपश्चर्येचें फल आहे. माझा धंदा मांस विकण्याचा आहे खरा, पण मी स्वतः प्राण्यांची हिंसा करीत नाहीं. दुसऱ्यांनीं ज्या प्राण्यांना ठार मारिलें असेल त्यांचेंच मांस मी विकीत असतों.

मी माझ्या उपजीविकेचा भार कोणावरही टाकीत नाहीं. कोणत्याही कारणामुळें मी आपला धर्म सोडीत नाहीं.

गोपाळ—आईबापांच्या सेवेचा केवढा हा परिणाम. आई-बापांच्या सेवेनें असे सद्गुण अंगीं येत असतील, तर या पुढें आम्हीही आईबापांची सेवा करूं.

गुरुजी—अरे, हिंदुधर्माची तुम्हांस आईबापांची सेवा करा अशी आज्ञा आहे. हिंदुधर्माचा प्रत्येक आदेश प्रपंच आणि परमार्थ या दोन्हीला उपकारक असतो. आईबापांच्या सेवेमुळें या जगांत तर तुम्हांला सुख होईलच; पण परलोकीं तुम्हांला सद्गति मिळेल. मातापितरें हीं दैवतें आहेत असें आपल्या हिंदुधर्मानें सांगितलें आहे. प्रभु रामचंद्रजींनीं सावत्र आईचा सुद्धां शब्द खालीं पडूं दिला नाहीं आणि पित्याच्या वचनासाठीं अरण्यवास पतकरिला. भीष्मांनीं तर वडिलांकरितां आजन्म ब्रह्मचर्य व्रताची प्रतिज्ञा केली. दररोज सकाळीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें आईबरोबरच बापालाही नमस्कार करा. आईबापांना देव माना. आईबापांना दररोज नमस्कार केला असतां आयुष्य, तेज, बल आणि विद्या यांची प्राप्ति होत असते. आई-बापाप्रमाणेंच गुरुची आज्ञा मानणें हेंही तुमचें एक कर्तव्य आहे.

वया—गुरु म्हणजे काय ? त्याचा उपकार आपणांवर कसा कसा होतो, आम्ही त्याच्याकरितां काय काय केलें पाहिजे हें समजावून सांगा.

गुरुजी—ऐका, सांगतों. विद्या देणाऱ्याला गुरु असें म्हणतात. लहानपणीं मातेचें शिक्षण, पुढें कांहीं दिवस वडिलांचें शिक्षण आणि पुढें जन्मभर गुरूचेंच शिक्षण असतें. विद्यादात्या गुरूची

किंमत सर्वांत श्रेष्ठ मानिली आहे. मातापितरें फक्त जन्म देतात, शरीर देतात, पण दिव्यज्ञान हें गुरूपासूनच मिळतें. विद्यादाता जो गुरु, तो जें काहीं शिक्षण देईल त्यावरच आपलें भवितव्य अवलंबून असतें. म्हणूनच गुरूला जीवनदाता असें म्हणतात.

चंपावती—जीवनदाता म्हणजे काय ?

गुरुजी—जीवनदाता म्हणजे या जगातील आयुष्यक्रमांत ज्या अडचणी, जीं संकटें नि जे प्रसंग येतात त्यांत निभावून जाण्याचें ज्ञान नि सामर्थ्य जो देतो तो होय.

कृष्णा—हें सामर्थ्य कशामुळें प्राप्त होतें ?

गुरुजी—विद्यारूपी अमृत तुम्हाला गुरूपासून मिळालें कीं हें सामर्थ्य येतें. विद्यामृत पहिल्यानें आपणाला कडू लागतें आणि आपण त्यापासून दूर राहण्याचा प्रयत्न करितो. पण गुरु हा तें अमृत दादा बाबा करून, विनवण्या करून, किंवा धाक दाखवूनही तुम्हास पाजितो. त्याच्या या उपकारामुळेंच आपला आयुष्यमार्ग सुखाचा होतो.

भागीरथी—गुरुजी, वर्गांत मुलें केव्हा केव्हा मास्तराच्या चेष्टा करितात.

गुरुजी—गुरूच्या बोलण्याची नक्कल करणें, गुरू चालतो तसें चालून दाखविणें किंवा अशाच काहीं माकडचेष्टा करणें हें कृतघ्नपणाचें काम आहे. अगदीं थोडें शिक्षण देणाऱ्या गुरूशींसुद्धां विद्यार्थ्यांनीं कृतज्ञपणानें वागलें पाहिजे. तुम्ही आज फी देऊन जरी शिकत असला आणि मास्तर पगार घेऊन शिकवीत असले तथापि आजची सुद्धां विद्या गुरूच्या प्रसन्नतेशिवाय प्राप्त होत नाहीं.

मुलांना पुष्कळ शिकवावें नि उत्तम शिकवावें असें गुरूला वाटलें पाहिजे. असें वाटावयास लावण्यासारखें तुमचें वर्तन पाहिजे. विहीर बरीच खोल खणली म्हणजे पाण्याचा झरा लागतो. विद्येचीही तशीच गोष्ट आहे. गुरूच्या अंतःकरणांत जो ज्ञानाचा झरा असतो तो तुम्हांला हस्तगत करावयाचा आहे म्हणून गुरूशीं सभ्यतेनें व नम्रतेनें वागा. वेदामध्यें ' आचार्यदेवो भव ' (गुरूला देव मान ) असें सांगितलें आहे. त्याप्रमाणें वागण्याचा यत्न करा.

चया—माता पिता आणि गुरु याचा आम्हांला किती उपयोग आहे, त्याच्या सांगण्याप्रमाणें वागण्यात आमचें किती हित आहे, हें आतां नीट ध्यानांत आलें.

गुरुजी—तुम्हांला या गोष्टी चांगल्या समजाव्या नि तुमच्या हातून धर्माप्रमाणें वर्तन व्हावें हीच माझी इच्छा आहे. बरें तर मग तुम्ही आतां उद्यापासून सकाळीं उठून दररोज आईबापांना नमस्कार करणार ना ?

रामनाक—हो हो, मी तर करणार. पण नमस्कार साधा कीं साष्टांग ?

गुरुजी—कसलाही करा, पण करा म्हणजे झालें. शाळेंत आल्यावर शिक्षकाना नमस्कार करीत जा आणि रस्त्यात भेट झाली असतां देखील नमस्कार करीत चला.

भागीरथी—आई, बाप आणि गुरु यांच्याशीं कसें वागावयाचें हें आपण सांगितलें. पण घरातलीं वहीणभावंडें, वृद्ध, वडील माणसें यांच्याशीं कसें वागावें हें नाहीं का सांगत ?

गुरुजी—होय, होय, सांगतों बरें. घरामध्यें बरोबरीच्या माणसां-

शीं, उद्यानाशीं नि वडिलांशीं तुमचें वर्तन कसें असावें, तसेंच घराबाहेरच्या व्यवहारांत ज्या ज्या मनुष्याशीं तुमचा संबंध येतो त्यांच्याशीं तुमचें वर्तन कसें असावें हें सर्व मी सांगणार आहें. आजच्या विषयाचें नीट चिंतन करून या. पुढच्या पाठांत तो विषय तुम्हांला सांगेन.

---

## सहाव्या पाठाची पुरवणी.

### पितृदेवोभव, आचार्यदेवो भव ( उपनिषत् )

### पिता

### ( शांतिपर्व अध्याय २७२ )

गुरुरग्र्य परो धर्म । पोषणाध्यापनान्वित ।
पिता यदा ह धर्म स । वेदेष्वपि सुनिश्चितः ॥ १७ ॥
प्रीतिमात्र पितु पुत्र । सर्व पुत्रस्य वै पिता
शरीरादीनि देयानि । पिता त्वेक प्रयच्छति ॥ १८ ॥
तस्मात्पितुर्वच कार्यं । न विचार्यं कदाचन
पातकान्यपि पूयन्ते । पितु शासनकारिणः ॥ १९ ॥
पिता धर्म पिता स्वर्ग । पिता हि परम तप ।
पितरि प्रीतिमापन्ने । सर्वा प्रीणन्ति देवता ॥ २१ ॥
आशिषस्ता भजन्त्येन । पुरुष प्राह यत्पिता
निष्कृति सर्व पापानां । पिता यच्चाभिनंदति ॥ २२ ॥

## गुरु

### ( शांतिपर्व अध्याय १०८ )

दशेन तु सदाचार्य. । श्रोत्रियानधितिष्ठति ।
दशाचार्यान् उपाध्याय । उपाध्यायान् पिता दश ॥ १६ ॥
पितृन्दश तु मातैका । सर्वां वा पृथिवीमपि ।
गुरुत्वेनाभिभवति । नास्ति मातृसमो गुरुः ॥ १७ ॥
गुरुर्गरीयान्पितृतो । मातृतश्चेति मे मतिः
उभौहि मातापितरौ । जन्मन्यनोपयुज्यत· ॥ १८ ॥
शरीरमेतौ सृजतः । पिता माता च भारत ।
आचार्यशिष्टा या जाति. । सा सम्यगजरामरा ॥ १९ ॥

## गुरुसेवा

### ( मनुस्मृति अध्याय २ )

नीचं शय्यासनं चास्य । सर्वदा गुरुसन्निधौ ।
गुरोस्तु चक्षुर्विषये । न यथेष्टासनो भवेत् ॥ १९८ ॥
नोदाहरेदस्य नाम । परोक्षमपि केवलम् ।
न चैवास्यानुकुर्वीत । गतिभाषितचेष्टितम् ॥ १९९ ॥
गुरोर्यत्र परीवादो । निन्दा वाऽपि प्रवर्तते ।
कर्णौ तत्र पिधातव्यौ । गन्तव्य वा ततोन्यत ॥ २०० ॥
यथा खनन् खनित्रेण । नरो वार्यधिगच्छति ।
तथा गुरुगतां विद्यां । शुश्रुषुरधिगच्छति ॥ २१८ ॥

## माता, पिता आणि गुरु

### ( मनुस्मृति अध्याय २ )

य मातापितरौ क्लेशं । सहेते संभवे नृणाम् ।
न तस्य निष्कृतिः शक्या । कर्तुं वर्षशतैरपि ॥ २२७ ॥
तयोर्नित्यं प्रियं कुर्यादाचार्यस्य च सर्वदा ।
तेष्वेव त्रिषु तुष्टेषु । तपः सर्वं समाप्यते ॥ २२८ ॥
तेषां त्रयाणां शुश्रूषा । परमं तप उच्यते ।
न तैरभ्यननुज्ञातो । धर्ममन्यं समाचरेत् ॥ २२९ ॥
इमं लोकं मातृभक्त्या । पितृभक्त्या तु मध्यमं ।
गुरुशुश्रूषया त्वेव । ब्रह्मलोकं समश्नुते ॥ २३३ ॥
यावत् त्रयस्ते जीवेयु स्तावन्नान्यं समाचरेत् ।
तेष्वेव नित्यं शुश्रूषां । कुर्यात् प्रियहिते रतः ॥ २३५ ॥

---

## पाठ सातवा.

### वृद्धसेवा, शिष्टाचार आणि व्यवहार.

गुरुजी— आज तुम्हाला काय सांगू ?

गोपाळ—आईबाप आणि शिक्षक यांच्याशिवाय इतरांशीं आमचें वर्तन कसें असावें हें आज सांगा

गुरुजी—आपल्या भोंवतीं जीं लहान, बरोबरीचीं नि मोठीं माणसें असतात त्या सर्वांचा शिक्षणाच्या कामीं आपल्याला मदत

होत असते. हीं सर्व माणसें आपल्याला निरनिराळ्या प्रसगीं अनेक गोष्टी शिकवीत असतात.

**भागीरथी**—लहान भावंडें आपणास काय शिकविणार? तीं तर आपल्यापेक्षा लहान असतात.

**गुरुजी**—लहान भावंडें शिकवीत नाहींत? खोटी गोष्ट आहे. समज, तुझा धाकटा पाळण्यांतला भाऊ रडतो आहे, आई जेवावयास बसली आहे, अशा वेळीं त्याला उगा करावयास, भागीरथी तू काय काय करशील?

**भागीरथी**—मी पाळण्याला झोंका देईन, टाळ्या वाजवीन, भांडें वाजवीन, इकडे तिकडे घेऊन हिंडेन नि काय पाहिजे तें करून आई उठेपर्यंत त्याचें रडें थांबवीन.

**गुरुजी**—झालें तर मग लहान मुलाला कसें उगा करावें, हें शिक्षण त्या मुलानें तुला दिलें नाहीं काय? आम्ही इतकें दिवस तुम्हाला शिक्षण देत आहोंत. परतु तुम्ही सुद्धां आम्हाला वेळोवेळीं त्या लहान मुलाप्रमाणें पुष्कळ शिक्षण देत असता लहान भावंडाशीं मोठ्या प्रेमानें, कळकळीनें आणि दयेनेंच वागलें पाहिजे. समज गोविंदा, तू अभ्यासाला बसला आहेस तुझी बहीण तेथें आली नि म्हणाली ' दादा काय रे वाचतास? ' तर तू तिच्याशीं कसा वागशील बरें?

**गोविंदा**—मी तिला सांगेन कीं चालती हो यथून, अभ्यासाच्या वेळा उगीच किरकिर लाविली आहे! मुकाट्यानें गेलीस तर ठीक, नाहीं तर चूल, बोळकीं, बाहुल्या सगळें फेंकून देईन.

**गुरुजी**—अरे वारे बृहस्पती! तुइयाशीं तुझ्यापेक्षा वडील माण-

ऱ्यांनीं उठतां लाय बसतां बुक्की असें जर वर्तन केलें तर कसें काय होईल ? तें तुला आवडेल का ?

**गोविंद**—नाहीं नाहीं. मला नाहीं आवडणार.

**गुरुजी**—म्हणूनच बाबा, आपल्या लहान भावंडाना असें उद्धटपणाचें उत्तर देऊन त्यांचा हिरमोड करूं नये. नेहमीं त्याच्याशीं गोड बोलून त्याच्या कोमल अंतःकरणाला धक्का न लागेल अशी वर्तणूक ठेवावी. समजा, तुम्ही घरामध्यें दहापाच भावंडें आहांत. एकमेकाला शिवीगाळ करीत, खाण्यापिण्याबद्दल मारामाऱ्या करीत नि कपड्यालत्त्याबद्दल जर रडारडी करीत बसलात तर तुमच्या आईबापाना मोठा आनंद होईल, नाहीं ?

**बया**—*आनंद कसला होणार ? आईबापाना असें वाटेल कीं हीं पोरें नसून एकप्रकारची साडेसातीच आहे.*

**गुरुजी**—*तर मग आईबापाना नि आपल्या भावंडाना बरें वाटावें म्हणून तुम्ही त्याच्याशीं प्रेमानें वागलें पाहिजे ना ? लहानाशीं प्रेमानें वागणें, बरोबरीच्याशीं मैत्री करणें आणि वडिलाशीं विनयानें वागणें ही एक प्रकारची ईश्वराची भक्ति आहे असें समजा जो मनुष्य या प्रकारें वागतो तो मनुष्य एक तऱ्हेनें ईश्वराची भक्तीच करितो, असें भागवतात म्हटलें आहे*

**रामनाक**—शेजाऱ्यापाजाऱ्याशीं कसें वागावें ?

**गुरुजी**—अरे, जसें आपण घरच्या माणसाशीं वागतों तसेंच शेजाऱ्यापाजाऱ्याशीं नि गावातील लोकाशीं वागावें. प्रत्येक ठिकाणीं आपल्यापेक्षा मोठीं नि लहान अशीं माणसें असतातच. तेव्हा त्याच्याशीं वर सांगितल्याप्रमाणेंच वागावें. उपकार करण्याची मधी

दवडूं नये. इष्टमित्राना मदत करावी. गोरगरिबांच्या उपयोगीं पडावें.

धोंडिबा—गुरुजी, वृद्धसेवा म्हणजे काय आणि ती कशी करावी ?

गुरुजी—मी आता तेंच सांगणार होतों. बरें झालें, तूं आठवण केलीस ती. ईश्वरकृपेनें तुमच्या घरीं जर म्हातारे आजोबा, आजीबाई, मावशी, आत्या, मामा असे कोणी असतील तर वृद्ध म्हणजे काय हें तुम्हाला समजेलच. अरे, या म्हाताऱ्या माणसापासून तरुणाना पुष्कळ शिक्षण मिळत असतें.

चंपावती—घरातील म्हाताऱ्या माणसांकडून कोणकोणतें शिक्षण मिळतें ?

गुरुजी—म्हाताऱ्या माणसाना आतापर्यंतच्या व्यवहाराचें, उलाढालींचें आणि अनेक अडचणींचें चांगलें ज्ञान असतें. तुमच्यासारख्या मुलानीं जर वृद्धांच्या सगतींत काहीं काळ घालविला तर तुमच्या पोरकट आणि अल्लड बुद्धीवर चांगला संस्कार होईल. दररोज सायंकाळीं वृद्धाच्या जवळ जाऊन बसणें, त्याचे हातपाय रगडणें, त्यांच्या जागेचा केर काढून त्याचें अंथरूण वगैरे घालणें, अशीं कामें तुम्हीं नेहमी केलीं पाहिजेत. वृद्धाच्या तोंडून शब्द बाहेर पडताच तुम्हीं सर्व कामें सोडून त्याच्या मदतीस धावलें पाहिजे. आईबापाप्रमाणें अशा वृद्धमाणसाचेही मुलाच्यावर पुष्कळ उपकार झालेले असतात. म्हणून त्याची सेवा करून त्याच्या अनुभवापासून आणि विचारापासून लाभ करून घेतला पाहिजे. तुम्ही बसला असला नि इतक्यात कोणी वृद्ध आले तर उठून त्यांना बसावयाला दिलें पाहिजे आणि ते बसल्यावर आपण बसलें पाहिजे. घरात दमे-

करी आजी असली किंवा अथ आजोबा असले तर कित्येक मुलें त्याच्या चेष्टा करीत असतात. हें तर मोठें पाप आहे असें तुम्ही समजा. वृद्धसेवेचें महत्त्व काय आहे तें वृद्धसेवा केल्यानेंच कळतें. अर्जुनालासुद्धां हें महत्त्व श्रीकृष्णांना एका प्रसंगीं पटवून द्यावें लागलें.

**भागीरथी**—कोणता तो प्रसंग ? नि श्रीकृष्णानीं अर्जुनाला महत्त्व कसें पटवून दिलें ?

**गुरुजी**—कौरवपांडवांचें घनघोर युद्ध चाललें होतें. भीम नि अर्जुन हे धर्माच्या मदतीस न जावेत म्हणून संशप्तक नांवाच्या लढवय्यांनीं त्यांना रोखून धरिलें. त्यामुळें कर्णानें धर्माला चांगलेंच जर्जर केलें. धर्म घावऱ्या घावऱ्या युद्ध सोडून निघून गेला. त्याच्या पाठोपाठ भीम, अर्जुन आणि श्रीकृष्ण हे धर्माच्या समाचाराकरिता त्याच्या शिबिरात आले. कर्ण अद्याप मेला नाहीं हें अर्जुनाच्या तोंडून ऐकिल्याबरोबर धर्मराजा रागानें लाल झाला. त्यानें अर्जुनाची खरडपट्टी काढली. त्याच्या धनुष्याची निंदा करून तें दुसऱ्यास देऊन टाक असें म्हटलें. अर्जुनानें गांडीव धनुष्याच्या निंदकास ठार करण्याची पूर्वी प्रतिज्ञा केली होती. म्हणून तो धर्मास ठार करण्याकरिता पुढें सरसावला. हा सर्व मूर्खपणा श्रीकृष्ण पहातच होते. कौरवांना मारता मारता अर्जुन धर्मालाच ठार मारितो आहे, हें पाहून श्रीकृष्णानीं त्याची निर्भर्त्सना केली, तेव्हां अर्जुनानें आपली प्रतिज्ञा श्रीकृष्णास सांगितली. कृष्ण म्हणाले, ' अरे बेअकल्या ! असली प्रतिज्ञा कोणी करतो काय ? तू वृद्धांची सेवा केली नाहींस ( न वृद्धा सेवितास्त्वया ), म्हणून हें काहीं तरी करतो आहेस. ' हें ऐकताच अर्जुन चपापला. नंतर श्रीकृष्णानीं

त्याला वृद्धसेवा म्हणजे काय, प्रतिज्ञा कोणती करावी, कोणती करूं नये, या सर्व गोष्टी समजावून दिल्या.

**रामनाक**—ही झाली पुराणातील गोष्ट. व्यवहारातली असली एखादी गोष्ट आहे काय ?

**गुरुजी**—होय. एक गृहस्थ होता त्याची आई नव्वद वर्षांची होती त्याला एक मुलगी होती. तिचें लग्न काहीं केल्या जुळेना शेवटीं एक खाष्ट व्याही भेटला. त्यानें ' माझ्या घरची विहीर तुपानें भरून दिल्यास मुलगी पतकरितों असें सांगितलें. मुलीच्या बापाला पंचाईत पडली. पण त्यानें वृद्ध मातुश्रीच्या म्हणण्याप्रमाणें रुकार दिला. दोहींकडचे वऱ्हाडी जमले. लग्नाची वेळ आली. तुपानें विहीर भरा असें व्याह्यानें सांगितलें लगेच म्हातारी पुढें झाली. ती म्हणाली, "व्याहीबोवा हं आटपा, विहीर लवकर कोरडी करा. विहिरींत एक पाण्याचा टिपूससुद्धा ठेवू नका. ती चांगली पुसून कोरडी करून या म्हणजे मी लगेच तूप भरतें बरें" असें म्हणतांच व्याही ओशाळला आणि त्यानें मुकाट्यानें लग्न करून टाकिलें. सारांश, वृद्धमाणसाची मदत केव्हा कशी होईल याचा नेम नसतो. लहानपणापासून त्याचें आपल्यावर प्रेम असतें, म्हणून वृद्धाच्या सेवेला चुकू नका इतकेंच तुम्हास सांगावयाचें आहे. असो आतां शिष्टाचाराविषयीं बोलू

**गोपाळ**—शिष्ट म्हणजे काय गुरुजी ?

**गुरुजी**—शिष्ट म्हणजे सभ्य मनुष्य. सभ्य मनुष्याच्या वागणुकीला सभ्याचार किंवा शिष्टाचार असें म्हणतात.

**तुळसा**—सभ्य माणसें कशीं वागतात ?

गुरुजी—सभ्य किंवा शिष्ट लोक हे सदैव गुरुसेवेमध्यें आणि वृद्धसेवेमध्यें तत्पर असतात. ते विनाकारण कोणावर रागावत नाहींत. यथाशक्ति दान देतात. खोटें बोलत नाहींत ईश्वरावर त्याची निष्ठा असते. गोरगरिबांना शिष्ट यथाशक्ति मदत करितात. मुके, आंधळे, पांगळे असे जे दुर्बल असतात त्यांच्याशीं शिष्ट अनुकंपेनें वागतात. विद्वान्, गुणी नि रसिक माणसाशीं शिष्ट स्नेह संपादन करितात आणि त्यांची बरोबरी आपलें सामर्थ्य वाढवून करितात. साधुसंत आणि सत्पुरुष यांशीं शिष्ट एकजीव होऊन जातात म्हणून शिष्टाचाराला धर्मप्रधाइतकें महत्त्व देण्यात येतें. सारांश शिष्ट जसे वागतात तसें वागणें हें तुमचें कर्तव्य आहे.

पुरुषोत्तम—गुरुजी, आम्ही कोठें कोठें कोणता कोणता शिष्टाचार पाळावा ?

गुरुजी—प्रत्येक ठिकाणचा शिष्टाचार मी सांगू लागलों तर आठदहा दिवसही पुरणार नाहींत. तथापि थोडासा सांगतों. आपल्या घरीं कोणी मनुष्य कांहीं कामा करिता आला, तर त्याला या, बसा, असें म्हणावें, योग्य त्या माणसाशीं त्याची भेट घालून द्यावी. घरात कोणी पाहुणा आला तर त्या अपरिचित गृहस्थाना सर्व प्रकारचें साहाय्य करावें. न शाला आरों अमक्याच्या घरीं, असें त्याला वाटू नये. चार मंडळींत बसण्याचा प्रसंग आला तर डोकें खाजवीत, नखें खात, गवताच्या काड्या तोंडांत वमू नये रस्त्यानें जाताना आंधळे, स्त्रिया, विशेषत गरोदर स्त्रिया, दुबळी नि म्हातारी माणसें भेटल्यास त्यांना आधीं रस्ता द्यावा आगगाडीतही अशा माणसांना न बायका मंडळींना आधीं जागा करून द्यावी आणि मग आपण

बसावें. कोणी रस्ता पुसल्यास त्यास भलतेंच न सांगतां रस्त्याच्या खऱ्या खुणा सांगाव्या. अनोळखी अशा परक्या माणसावर एकदम विश्वास ठेवूं नये. वाटेवर लघुशंका करूं नये. रस्त्यानें खात खात हिंडूं नये. चार माणसें बसलीं असता मध्येंच आपण जाऊन त्यात बसूं नये. एकीकडे बसावें. मूर्ख लोकाच्या संगतींत राहूं नये. समर्थांनीं दासबोधांत अशा प्रकारच्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या आहेत.

**पुरुषोत्तम**—दासबोधात मूर्खाचीं लक्षणें सांगितलीं आहेत नाहीं?

**गुरुजी**—अरे! मूर्खाचीं सांगितलीं आहेत नि पढत मूर्खाचींही सांगितलीं आहेत. तीं फार सोप्या भाषेंत सांगितलीं आहेत. तुम्ही सगळे मिळून केव्हां तरी तीं वाचा; म्हणजे मूर्खपणाच्या गोष्टी कोणत्या नि शहाणपणाच्या गोष्टी कोणत्या हें तुम्हाला समजेल. सभेमध्यें कसें वागावें हें तुम्हाला ठाऊक आहे?

**रामचंद्र**—सभेला जावें, जागा मिळेल तेथें बसावें, टाळ्या वाजवाव्या म्हणजे झालें.

**गुरुजी**—अरे हा सभ्याचार नव्हे. सभेस वेळेवर जावें. गेल्यावर आपल्या बरोबरीच्या मडळींत बसावें. मोठ्या मडळींत बसू नये उगीच केव्हांतरी टाळ्या वाजवू नयेत. शांततेनें सर्व पहावें. मोठ्याच्या सभेंत तुमच्या सारख्या मुलांनीं आरडाओरडा करणें, एखाद्या वक्त्याची दुर्यो करणें या सर्व गोष्टी असभ्यपणाच्या होत. एखाद्या सभेस किंवा परिषदेस तिकीट असलें तर तिकीट न घेता चोरून लपून सभेस जाणें, तिकीट असलेंच तर एका प्रतीचें तिकीट घेऊन भलत्याच जाग्यावर जाऊन बसणें, स्वयंसेवकाशीं तंडातंडी करणें

या गोष्टी व्यवहारांत फुशारकी मारण्यासारख्या असल्या तरी शिष्टसंमत नाहींत. हें ध्यानांत ठेवावें.

बया—कीर्तन पुराणाला गेल्यावर कसें वागावें?

गुरुजी—कीर्तन पुराणाला गेल्यावर आधीं देवाला नंतर बुवाला नमस्कार करून बुवाकडे तोंड करून बसावें. काहीं काहीं माणसें बुवाकडे किंवा देवाकडे ढुंकूनहीं न पाहता मध्येंच एखाद्या खुंटा प्रमाणें जाऊन बसतात, तें अयोग्य आहे. भोजन समारंभाच्या वेळीं सर्व वाढून झाल्यावर आणि उदक सुटल्यावर आणि 'पार्वती पते, किंवा 'पुंडलीक वरदा, झाल्यावर भोजनास सुरवात करावी नेहमीं कीर्तन, पुराण, प्रवचन, सभा, व्याख्यान, परिषदा, यात्रा, उत्सव, या संबंधाचे शिष्टाचार आधीं समजून घ्यावेत आणि नंतर ठिक-ठिकाणीं त्याप्रमाणें वर्तन करावें. असल्या कोणत्याही प्रसंगीं हजर राहाण्याच्यापूर्वी तेथें आपण कसें वागावें हें आधीं ठरवून जावें म्हणजे त्यापासून आपल्याला, तसेंच आपल्यापासून दुसऱ्यालाही सुख होतें.

कृष्णा—शिष्ट लोक एकमेकाशीं कसें वागतात?

गुरुजी—सभ्यतेनें, नम्रतेनें आणि प्रेमळपणानें वागतात. शिष्ट नि सभ्य लोक कुणाशीही 'अरे कारे' ची भाषा बोलत नाहींत. सर्वांना 'अहो जाहो' असें म्हणतात.

रामनाक—शिष्टलोक लहान मुलाला सुद्धा 'अहो मुला म्हणतात?

गुरुजी—लहान मुलाला 'अहो मुला' म्हणत नाहींत पण प्रत्येक सज्ञान स्त्री पुरुषाला ते 'अहो जाहो' म्हणतात. तुम्हींही अठरा वर्षांवरच्या स्त्री पुरुषाना 'अहो जाहो' म्हणा.

**घोंडिबा**—सर्व जातींच्या माणसाना ' अहो जाहो ' म्हणायाचें काय ?

**गुरुजी**—होय, ईश्वरानें सर्व जातींची सारखीच योग्यता सांगितली आहे. म्हणून हिंदूतील कोणत्याही जातीची सज्ञान स्त्री असो या सज्ञान पुरुष असो त्याना तुम्हीं ' अहो जाहो ' असेंच म्हटलें पाहिजे. ' अरे जारे ' ची आशिष्ट पद्धत तुम्ही त्वकर सोडून द्या.

**सुभानगिरी**—गुरुजी, आपण सांगितलेला शिष्टाचार कळला. आता विद्यार्थ्यांचा व्यवहार कसा काय असावा तें सांगा.

**गुरुजी**—व्यवहार हा फार भानगडीचा आणि गुतागुतीचा आहे. व्यवहारात मनुष्यानें फार सावधपणानें वागलें पाहिजे. नाहींतर त्याचें नुकसान होतें.

**रामनाक**—व्यवहारात नुकसान तें कसलें ?

**गुरुजी**—समज तू बाजारात भाजी घ्यायला गेलास. तेथील माळी नि माळणी फार वस्ताद असतात. या दादा, या बाबा, म्हणून आपला पाहिजे तसला माल चागला म्हणून गिऱ्हाईकाच्या गळ्यात ते अडकवीत असतात. म्हणून बाजारात गेल्यावर चार दोन ठिकाणीं चौकशी करावी नि मग जिन्नस घ्यावा नाहीं तर पैसा दुप्पट जाऊन माल थाईट मिळतो मुलानो, तुम्ही वडिलाच्या बरोबर कधीं बाजारहाट केला आहे काय ?

**गोविंद**—मला बाबानीं एकदा बाजारांत नेलें होतें. पण मी त्याना हें घ्या तें घ्या असें भडावून सोडल्यामुळें ते मला बाजारात पुन्हा नेईनात.

रामचंद्र---आमचे काका मात्र मला वरचेवर बाजारांत घेऊन जातात.

गुरुजी---वडील हे तुम्हांला चांगले व्यवहारशिक्षक आहेत. म्हणून सर्व प्रकारचा त्यांचा व्यवहार तुम्ही पाहात चला. अलीकडे शिकले सवरलेले लोक सुद्धां व्यवहारशून्य असतात अशी ओरड आहे आणि ती खरी आहे.

प्रेमचंद---व्यवहारशून्य म्हणजे काय ?

गुरुजी---ऐक आता व्यवहारशून्यपणा. एका मुलाला त्याच्या बापानें १० रुपये देऊन रेशीमकांठी धोतरजोडा आणण्यास सांगितलें. मुलगा पडला विद्वान् आणि चिकित्सक! त्यानें धोतरजोडा न घेता चार जिन्नस खरेदी केले.

गंगू---ते कोणते ?

गुरुजी---रेशीम, काठी, धोतर आणि जोडा !

रामचंद्र---तो मुलगा मोठा बृहस्पतीच होता म्हणावयाचा.

गुरुजी---*अरे तो मुलगाही तुमच्याच सारखा होता. या गोविंदा*ला मी परवां बाजारांत दोन पैसे देऊन पाठविलें होतें. मग त्यानें काय केलें तें विचार.

गोपाळ---कायरे गोविंदा काय केलेंस साग बरें ?

गोविंद---गुरुजींनी मला दोन पैसे देऊन मुळे नि काकडी आणण्यास सागितलें. पण बाजारांत गेल्यावर कोणत्या पैशाचे मुळे घ्यावेत नि कोणत्या पैशाची काकडी घ्यावी हीं पंचाईत मला पडली. म्हणून मी घरीं परत आलों.

गुरुजी---तुम्ही सगळेजण अडाण्यासारखे वागता. परवां त्या

गोपाळाला रामचंद्रपंताकडे एक निरोप देऊन पाठविला होता. त्यानें तो निरोप भलताच सांगितला. तुम्हाला पत्राचे मायने काहीं ठाऊक आहेत काय ?

**रामनाक**—आहेत थोडेबहुत माहीत.

**गुरुजी**—हा व्यवहार शाळेतल्या शिक्षणात आला तर ठीकच; नाहींतर तुम्ही तो घरीं शिकावा. चिरंजीव, तीर्थरूप, सौभाग्यवती, गंगाभागीरथी, साष्टांग नमस्कार, विनंति विशेष हे सर्व मायने तुम्हीं समजून घेतले पाहिजेत नि त्याप्रमाणे पत्रें लिहिलीं पाहिजेत. पोष्टाचा व्यवहार, रेल्वेचा व्यवहार, बँकेचा व्यवहार, जमाखर्च, देण्याघेण्याचा व्यवहार याची थोडीबहुत तुम्हाला माहिती पाहिजे. बारा महिन्यात जे सण येतात त्याची माहिती तुम्हाला आहे का ?

**दया**—थोडीबहुत आहे. पण ओळीनें काहीं सागता येणार नाहीं.

**गुरुजी**—मी सणाची धार्मिक आणि ऐतिहासिक माहिती तुम्हाला पुढें सागणार आहें म्हणून आता सागत नाहीं.

**चंपावती**—आता पुढच्या पाठात कोणत्या कर्तव्याचा आपण विचार सागणार ?

**गुरुजी**—माता, पिता, गुरु याच्याशीं कसें वागावें, यांच्या संबधात तुमचीं कर्तव्यें कोणतीं, तसेंच वृद्धसेवा, शिष्टाचार आणि व्यवहार इतका विषय सागितल्यावर या पुढचा विषय शुचिता म्हणजे शौचधर्म हा येतो, त्याचा विचार पुढच्या पाठांत सांगेन.



## सातव्या पाठाची पुरवणी.

### मनुस्मृति अध्याय. २

ऊर्ध्वं प्राणा ह्युत्क्रामन्ति । यून स्थविर आयति ।
प्रत्युत्थानाभिवादाभ्या । पुनस्तान्प्रतिपद्यते ॥ १२०
अभिवादनशीलस्य । नित्य वृद्धोपसेविनि
चत्वारि तस्य वर्धन्ते । आयु र्विद्या यशो बलम् ॥ १२१ ॥

### अनुशासनपर्व अध्याय १६१

पन्था देयोहि विदुषे । गोभ्यो राजम्य एव च
वृद्धाय भारतप्ताय । गर्भिण्यै दुर्बलाय च ॥ २६ ॥
हीनाङ्गानतिरिक्ताङ्गान् । विद्याहीनान्वयोधिकान्
रूपद्रविणहीनाश्च । सत्यहीनाश्च नाक्षिपेत् ॥ ३६ ॥
स्रजश्च नावकृष्यत । न बहिर्धारयोत च ॥ ९६ ॥
अभिवादयीत वृद्धाश्च । दद्याच्चैवासनं स्वयम्
कृताञ्जलिरुपासीत । गच्छन्त पृष्टतोऽन्वियात् ॥ ७० ॥
न सहताभ्या पाणिभ्या । कण्डूयेदात्मन शिर
न चाभीक्ष्ण शिर स्नायात । तथा स्नायु र्न रिष्यते ॥ ७३ ॥
पतितैस्तु कथा नेच्छेत् । दर्शन च विवर्जयेत्
ससर्गं च न गच्छेत । तथा ऽऽयुर्विन्दत महत् ॥ १२ ॥

### मनुस्मृति अध्याय २

वित्त बधु र्वयः कर्म । विद्या भवति पचमी
एतानि मान्यस्थानानि । गरीयो यद्यदुत्तरम् ॥ १३६ ॥

चक्रिणो दशमीस्थस्य । रोगिणो भारिणः स्त्रियाः ·
स्नातकस्य च राज्ञश्च । पन्था देयो वरस्य च ॥ ११८ ॥
वयसः कर्मणोऽर्थस्य । श्रुतस्याभिजनस्य च अ. ४
वेषवाग्बुद्धिसारूप्यं । आचरन् विचरेदिह ॥ १८ ॥

समर्थ ( दासबोध दशक २।१ )

अकारण हास्य करी । विवेक सांगतां न धरी
जो बहुतांचा वैरी । तो एक मूर्ख ॥ १३ ॥
बहुत जागते जन । तयांमध्यें करी शयन
परस्थळीं बहु भोजन । करी तो एक मूर्ख ॥ १९ ॥
औषध नेघे असोनि व्यथा । पथ्य न करी सर्वथा
न मिळे आलिया पदार्था । तो एक मूर्ख ॥ २२ ॥
परपीडेचें मानी सुख । परसंतोषाचें मानी दुःख
गेले वस्तूचा करी शोक । तो एक मूर्ख ॥ ४५ ॥
अनीतीनें द्रव्य जोडी । धर्म न्याय नीति सोडी
संगतीचें मनुष्य तोडी । तो एक मूर्ख ॥ ५९ ॥
दोघे बोलत असती जेथें । तिसरा जाऊन बैसे तेथें
डोई खाजवी दोहीं हातें । तो एक मूर्ख ॥ ६३ ॥
कलह पाहात उभा राहे । तोडविना, कौतुक पाहे
खरें असतां खोटें साहे । तो एक मूर्ख ॥ ६७ ॥
आपण वाचीना कधीं । कोणास वाचावया नेदी
बांधोनि पुस्तक ठेवी बंदी । तो एक मूर्ख ॥ ७६ ॥

करी थोडें, बोले फार । ता एक मूर्ख ॥
अधस्य पथा बाधिरस्य पथा स्त्रिया पन्था भारवाहस्य पथा ।
भारत वनपर्व

महतां वहुमानेन दीनानामनुकंपया ।
मैत्र्या चवात्मतुल्यषु यमन नियमनच ॥ भागवत.

---

## पाठ आठवा.

### शौचधर्म.

गुरुजी—मुलानो, मी आज तुम्हाला शौचधर्म म्हणज स्वच्छता याबद्दल सागणार आहें.

कृष्णा—स्वच्छतेचा नि धर्माचा काय सबध ? धर्म निराळा नि स्वच्छता निराळी.

गुरुजी—अरे, तसें नाहीं. हिंदुधर्मानें मनुष्याच्या प्रपचाचा आणि परमार्थाचा असा दोहोंचा विचार केलेला आहे. म्हणून स्वच्छतासुद्धा धर्मांतच यते सर्व प्रकारच्या स्वच्छतेनें आयुष्य वाढतें, शरिराला आरोग्य प्राप्त होतें आणि तसें असलें म्हणूनच मनुष्याच्या हातून धर्माचरण होतें प्राचीन काळीं मुलगा गुरुगृहात गेला म्हणजे पहिल्यानें त्याला शौचधर्म शिकवीत असत.

बया—बरें तर मग सागा आम्ही कुठें कुठें नि कसकशी स्वच्छता ठवावी ?

गुरुजी—सकाळीं उठल्याबरोबर प्रात स्मरण करण्यापूर्वी चागली खुळखुळून चार पांच वेळा चूळ भरावी, पाणी घेऊन

त्रीला जाऊन यावें नि नतर प्रातः स्मरण म्हणावें. उठल्याबरोबर पारोशान बुरशा तोंडानें प्रातःस्मरण, अभ्यास किंवा इतर कांहीं करू नये. सकाळच्या प्रहरीं बुरशा तोंडात विषारी थुकी असते. अन्नाचे कुजलेले कण थुकींत असतात. म्हणून नेहमी रात्रीं निजण्यापूर्वी दहा पाच वेळा खुळखुळून चूळ भरावी नि सकाळीं उठल्याबरोबरही तसेंच करावें.

**रामचंद्र**—गुरुजी, तोंड कसे धुवावें?

**गुरुजी**—अरे थाव. मी हळू हळू सगळें सागणार आहें. सकाळीं प्रात स्मरण झाल्यावर लगेच शौचास जावें. कित्येक मुलें अगदीं निकड लागली असली तरी तशीच बसतात, तें अगदीं वाईट आहे. शौचाला होत नसताना उगाच जाऊन कुथत वसूं नये नि होऊ लागलें म्हणजे इतर व्यवहारामुळे दाबून ठेवू नये. शोचशुद्धि ही डाव्या हातानें चागली करावी शौचाला जें भाडें आपण घेऊन जातों तें केव्हाही डाव्या हातानें आणू नये. शोचशुद्धीनतर हातपाय धुईपर्यंत डावा हात अपवित्र समजावा आणि त्या हातानें कोणताही व्यवहार करू नये.

**प्रेमचंद**—शोचकूपाला कडी कोणत्या हातानें लावावी?

**गुरुजी**—हो बरें विचारलेंस. अर डाव्या हातानें कडी लावू नये. फार काय पण दोन तीन वेळा माती लावून तो हात स्वच्छ करीपर्यंत कोणताही व्यवहार त्या हातानें करू नये. शिवाय शौचकूपापेक्षा नेहमी शक्य तर गावाबाहेर शौचाला जावें हें चागलें. समर्थ म्हणतात ' दिशेकडे दूरी जावे । जें कोणासी नव्हे ठावें॥ वहिर्दिशा हें नांव बरोबर आहे. गावाबाहेर शौचाला जाणें ही गोष्ट

खेड्यातील लोकांना शक्य आहे. त्यांनीं हें पक्कें लक्षात ठेवावें कीं गावात किंवा घराच्या आसपास परसाकडेस बसल्यानें अधर्म होतो. गावात एकंदरीनें घाण होते नि लोकाचें आरोग्य बिघडतें. लघवीला जाताना नेहमी पाणी घेऊन जावें. कित्येक ठिकाणीं अगदीं घरातील आंगणात लघवी करितात तें आरोग्यदृष्ट्या अपायकारक आहे. घरातील आंगणात लघवी किंवा इतर कोणतीही घाण करू नये. कोणतीही घाण राहण्याच्या जागेपासून दूर असावी. पुष्कळ माणसांना थुंकावें कोठें हेंही समजत नाहीं. कित्येक घरातील कोपऱ्यात खाकरे टाकितात, कित्येक भिंतीवर थुकून त्या खराब करितात, कित्येक अगदीं बसावयाच्या जागेच्या पुढील चौथऱ्यावर तंबाकूच्या पिचकाऱ्या मारून तो लाल करितात. आगगाड्या नि आगबोटी यातील प्रवासी थुकून थुकून इतकी घाण करितात कीं ती पाहिल्यावर ओकारी येते. आगगाडीच्या डब्यात 'थुकू नका' थुंकण्यानें रोग वाढतो, अशा पाट्या लावलेल्या असतात. पण तिकडे फारच थोडे लोक पाहातात. पाहिजे तेथें थुकण्याची संवय अती वाईट आहे थुकणें, नाक शिंकरणें, लघवी करणें, शौच करणें या सर्व गोष्टी करताना स्वच्छता आणि पवित्रपणा याचीं तत्त्वें लक्षांत ठेवून वागलें पाहिजे. मुलांनो, घरोघरीं या अमंगळ व अस्वच्छ गोष्टी तुम्ही पाहात असाल त्या नाहींतशा करणें हें तुमचें काम आहे.

अमृतलाल—शौचास जाऊन आल्यावर डावा हात मातीं लावून दोन तीन वेळां चांगला धुवावा. असें आपण सांगितलें. पुढें काय करावें?

गुरुजी—डावा हात चांगला धुतल्यानंतर मग दुसरी माती

घेऊन शौचाचें भांडें ( तपेली अगर तांब्या ) स्वच्छ घासावा. पुष्कळ मोठीं मोठीं माणसेंसुद्धां हा व्यवहार चुकतात. शौचाहून येतांच त्याच भांड्यांतील पाणी जमिनीवर ओतून त्यावर डावा हात घासतात नि त्याच बरबटलेल्या हातानें लगेच भांडें घासतात; असें करणें अगदीं घाणेरडें आहे. आधीं डावा हात माती लावून स्वच्छ धुवावा, नंतर भांडें घासावें आणि पुढें दोन्ही पाय, घोटे नि टांचासुद्धां चांगलें स्वच्छ धुवावें. कांहीं मुलें पायाला हात न लावतां नुसतें पायावर पाणी ओततात. पायावर पाणी ओतणें नि पाय चांगलें धुणें या गोष्टी एक नव्हत.

काशी—आतां तोंड कसकसें धुवावें तें सांगा.

गुरुजी—वर सांगितल्याप्रमाणें शौचशुद्धि केल्यावर मग डोळे, नाक, कान, तोंड हीं सर्व स्वच्छ करावीं. पहिल्यानें दांत चांगलें स्वच्छ घासावें. दांत घासण्याकडे तुम्ही मुलें दुर्लक्ष करतां आणि आईबाप योग्य ती काळजी घेऊं शकत नाहींत. अशा स्थितींत मुलांचे दात लवकर किडतात.

रामनाक—दांत किडले म्हणजे काय होतें ?

गुरुजी—दात किडले म्हणजे दुखूं लागतात आणि लवकर पडतात. दात पडले कीं अन्न चांगलें चावता येत नाहीं. मग प्रकृतीला अपाय होतो.

कृष्णा—दांत कशानें घासावेत ?

गुरुजी—आपल्या धर्मशास्त्रकारांनीं दंत धावन हा एक धार्मिक विधि मानिला आहे. दंत धावन म्हणजे दात धुणें-घासणें. दांत घासण्यास त्यांनीं बाभळीची काडी, आघाड्याची काडी, कडूलिंबाची

काडी घ्यावी असें सांगितलें आहे. गुजराथेंत आणि उत्तर हिंदुस्थानांत अशा निरनिराळ्या प्रकारच्या काड्यांनीं दात घासण्याची फार चांगली पद्धत आहे. आपल्या महाराष्ट्रांत राखुडीनें दात घासण्याचा सर्वत्र प्रचार आहे. तीही चांगली आहे. गाईच्या शेणाचें शेणकूट करावें नि त्याची राखुडी करावी. राखुडी करतांना मिठाचें पाणी शिंपडलें तर तें फार उत्तम. रानशेणीची राखुडी ही सर्वांत उत्तम.

भागीरथी—दात घासण्याकरितां हल्लीं तांबडी, पांढरी अशी कमळीशी पूड वापरतात. आमचा दादा तर दररोज पूड नि कुचला घेऊनच दात घासतो. दात बळकट होण्यास कोणते पदार्थ वापरावेत?

गुरुजी—बाभळीची आंतरसाल आणावी, ती वाळवावी, आणि कुटावी, त्यांत थोडा कात नि थोडी तुरटी टाकावी ही नखगाळ पूड दात घासण्याला अत्युत्तम होय, किंवा बकुळीची * साल आणून वाळवावी, थोडा कापूर नि थोड्या हिरड्याच्या सालीं आंत टाकून त्याची वस्त्रगाळ पूड करावी. दातांतून रक्त येणें, दात हालणें आणि दुखणें हे सर्व विकार या पुडीच्या योगानें नाहींतसे होतात. बदामाच्या सालीं न कुटून कोळसा करावा, त्याची वस्त्रगाळ पूड करावी. त्यांत थोडा कापूर नि थोडें मीठ टाकावें किंवा मीठ न टाकतां तुरटीच्या लाह्यांची पूड टाकावी. आतापर्यंत सांगितलेल्या कोणत्या तरी नियमानें नेहमीं दात स्वच्छ ठेवणें हेंच तुम्हांला सांगावयाचें आहे. दातांच्या स्वच्छतेबद्दल घरापेक्षां तुम्हांला जास्त काळजी घेण्यांत येत हें तुम्हांला ठाऊक आहे का?

---

* टीप—बकुळीला वैद्यशास्त्रांत [illegible]

कृष्णा—तुरुंगांत कोण काळजी घेतें?

गुरुजी—तुरुंगांत जे कैदी जातात त्यांच्या दातांची काळजी तुरुंगावरील अधिकारी घेतात. बाभळीच्या काडीनें दांत घासलेच पाहिजेत, असा विसापूर, नि येरवडा येथील तुरुंगांचा नियम आहे. विद्यार्थ्यांनो, तुम्हीं दांत चांगले स्वच्छ ठेवा; म्हणजे पुष्कळ दिवस जगाल. दांत लवकर पडले, अधू झाले कीं लवकर मरण आले असें समजावें. मग कुठला देव आणि कुठला धर्म? दांत जसे सकाळीं घासावे तसेच केव्हांही काहीं खाल्ल्यानंतर चार दोन वेळां चुळा भरून दांतांवरून बोट फिरवावें. विशेषतः रात्रीच्या जेवणानंतर आचविताना दांत चांगले स्वच्छ करावेत. बाभळीच्या काडीनें रात्रीं निजण्यापूर्वीं दात घासणें हा सर्वांत उत्तम उपाय आहे. कित्येक लोक दोन्ही वेळा दात घासतात.

प्रेमचंद—तोंड धुणें, दात घासणें, याचा शौचधर्म आम्हाला कळला. आता आंघोळीबद्दल सांगा.

गुरुजी—स्नान किंवा आंघोळ ही प्रत्येक विद्यार्थ्यानें दररोज केलीच पाहिजे. हिंदुस्तान देशांत उत्तरेकडील काहीं मुलुख सोडून दिला तर दररोज स्नान सोसेल असेंच हवापाणी आहे. म्हणूनच भगवान् मनूनींही ‘ नित्य स्नात्वा शुचिः कुर्यात् ’ नहमीं स्नान करून शरीर स्वच्छ ठेवावें असें म्हटलें आहे. शरीराची दुर्गंधी नाहींसें करणारें, आरोग्य वाढविणारें नि कान्ति देणारे स्नानासारखें दुसरें कोणतेंही साधन नाहीं, म्हणून तुम्ही विद्यार्थ्यांनीं दररोज सकाळीं सूर्योदयापूर्वीं स्नान केलें पाहिजे.

रामनाक—आंघोळीपासून काय काय फायदे होतात?

गुरुजी--अरे, स्नानापासून पुष्कळ फायदे होतात. तूं दररोज नियमानें वर्ष दोन वर्षे स्नान कर म्हणजे तुझे तुला सर्व फायदे कळतील. स्नानाळें कुरूप मनुष्यही सुरूप दिसतो, बल वाढतें, कांति चढते, आवाज खुलतो, बुद्धि तीक्ष्ण होते आणि तोंडानें शुद्ध नि स्पष्ट उच्चार करितां येतो.

तुळमा—स्नान थंडपाण्यानें करावें का ऊन पाण्यानें करावं?

गुरुजी--सोसत असल्यास दररोज थंड पाण्यानें स्नान करावें. आजार, अशक्तता किंवा पाणी चांगलें न मिळणें अशा वेळीं ऊन पाण्यानें स्नान करावें. परंतु महाराष्ट्रांत चांगलें पाणी मिळत नाहीं म्हणजे हिंपारी पाणी आहे, जड पाणी आहे असें क्वचितच होतें. म्हणून विद्यार्थ्यांनीं नेहमी थंड पाण्यानें स्नान करावें, गांवाला चांगली नदी आहे, ओढा आहे, तळें आहे अगर विहीर आहे तर त्या पाण्यांत जाऊन स्नान करणें फार उत्तम. नदीकांठीं वाहत्या पाण्यांत नित्य स्नान करण्याचें ज्यांना भाग्य लागतें ते सुदैवीच समजावेत. शहरांत घरोघरीं पाण्याच्या तोट्या असतात. कोठें कोठें हौद असतात, तेथें जाऊन स्नान करावें.

गंगू—ऊन पाण्यापेक्षा थंड पाण्यानें स्नान करणें चांगलें का?

गुरुजी—होय, मघाशीं मी जे रामनाकला स्नानाचे गुण सांगितले ते थंड पाण्याच्या स्नानाचे होत. ऊन पाण्याच्या स्नानाचे नव्हेत. ऊन पाण्यानें स्नान केल्यास डोळ्यांना, केंसांना नि मेंदूलाही अपाय होतो असें वैद्यशास्त्रांत म्हटलें आहे. परंतु थंडपाण्याचें स्नान हें सर्व दृष्टीनें उपकारक आहे.

मोरू—तें कसें?

गुरुजी—अरे थंड पाण्याचें स्नान हें पहिल्यानें तुम्हांस स्वावलंबन शिकवितें. ऊन पाण्याच्या आंघोळीकरितां तुम्हाला कोणाच्या तरी मदतीची जरूर असते. परंतु थंड पाण्याच्या स्नानाला दुसऱ्याची मदत लागत नाहीं. विहिरींतून पाणी काढावयाचें असल्यास स्वावलंबनाचा धडा चांगलाच गिरविता येतो. दहापांच घागरी पाणी ओढलें, धोतरें स्वच्छ धुवून टाकिलीं कीं आळस पळतो नि हुशारी येते.

संतोबा—स्नानामुळें आळस नाहींसा होतो काय ?

गुरुजी—अरे होय, एखादा आळशी मुलगा अंथरुणांतून नुकता उठला आहे, डोळे अर्धवट उघडतो आहे, धोतर सावरतो आहे, दोन्ही हातांनीं डोळे चोळतो आहे, अशा वेळीं त्याच्या डोक्यावर एक घागरभर थंडगार पाणी ओत म्हणजे बघ कसा आळस पळतो तो. मुलांनो, तुम्हांला आळस जर नाहींसा करावयाचा असेल, आणि त्या शत्रूवर जय मिळवावयाचा असेल तर स्नान हें शस्त्र हातांत घ्या आणि त्या शत्रूला झोडपून काढा. आळस गेला कीं मनाला प्रसन्नता नि हुशारी वाटते. स्नानानंतर संध्या करावयाची असते, तीही मन लावून करितां येते. स्नानामुळें उत्पन्न झालेली पवित्रता हें ईश्वरभक्तीचें मोठें साधन आहे. म्हणूनच सर्व धर्मकर्में ( संध्या, नमस्कार, गीतापाठ ) स्नानानंतर करावीं.

रामचंद्र—स्नान कसें करावें ?

गुरुजी—स्नान करितांना शरीर स्वच्छ धुवावें स्नान शरीरशुद्धीकरितां आहे हें पुष्कळ मुलें विसरतात. नुसतें पाण्यांत डुबणें, पोहणें, उड्या मारणें म्हणजे स्नान नव्हे. दररोजच्या चोवीस तासांच्या

व्यवहारात अंगाच्या कातडीबाहेर जे अपवित्र आणि विषारी मळ सांचलेले असतात ते धुवून काढण्याकरिता स्नान करावयाचें असतें. हात, पाय, पोट, पाठ, मान, खादा, बरगड्या, डोकें, माड्या, कंबर हे शरीराचे सर्व भाग चागले चोळचोळून स्वच्छ करावे. स्नान करिताना डोक्यावर आधीं पाणी घ्यावें. स्नान करिताना पहिल्यानें डोकें बुडविणें अगर भिजविणें चागलें.

पुरुषोत्तम—स्नान उघड्या हवेंत करू नये असें म्हणतात तें खरें काय?

गुरुजी—तें अगदीं खोटें आहे. स्नान उघड्या हवेंत करू नये, स्नानानतर अंगाला वारा लागू देऊ नये अशा ज्या गोष्टी डॉक्टर सागत असतात, त्या आजाऱ्याकरिता आहेत असें समजावें. हिंदुस्थानाच्या हवापाण्याला विनवाऱ्याचीं म्हणजे निवाऱ्याचीं आयोळीचीं घरें असणें पश्चिमेकडील देशाप्रमाणें बिलकुल जरुरीचें नाहीं. अरे, महाराष्ट्रातील सगळ्या नद्याच्या काठावर उघड्या हवेंत वाऱ्यात दररोज किती तरी मुलेंमाणसें नि बायाबापड्या स्नान करीत असतात. त्याना काहीं होत नाहीं आता एवढें खरें की अग न पुसता पुष्कळ वेळ गारठत बसणें, पोहण्यापेक्षा डुबतच पाण्यात राहाणें, गार वारा सुटला तरी चेंगटपणानें तासन्‌तास तेथें घालविणें या गोष्टी शरीरास अपायकारक आहेत. तेवढ्या टाळल्या म्हणजे उघड्या हवेंतील थड पाण्याचें स्नान कधींही अपायकारक होत नाहीं.

भालचंद्र--ऊन पाण्यानें कधींच स्नान करूं नये काय?

गुरुजी—दर पधरा दिवसांनीं अंगाला चागलें खोबऱ्याचें,

तिळाचें अगर आंवळ्याचें तेल लावून ऊन पाण्यानें स्नान करावें. आजारी नि अशक्त माणसानें नेहमी ऊन पाण्यानें स्नान करावें. तुमच्यासारख्या विद्यार्थ्यांनींसुद्धां कधीं खूप श्रम केले किंवा मजल मारली किंवा शारिरीक, मानसिक त्रास झाला तर ऊन पाण्यानें स्नान करावें. श्रमानंतर ऊन पाण्यानें स्नान केलें म्हणजे अंग चांगलें हलकें होतें; थकवा जातो नि झोंप चांगली येते. पहिलवान लोक अंगाला मालिस करून ऊन पाण्यानेंच स्नान करीत असतात. फार कढत नि अगदीं कोमट असलें पाणी अपायकारक आहे असें समजावें. दररोज स्नान करून शरीर पवित्र केल्यानें मनाची पवित्रता वाढते. शौचधर्मापैकीं मुख्य शुचिता म्हणजे पावित्र्य हें स्नानामुळेंच येतें हें लक्षांत ठेवून तुम्ही सर्वांनीं नित्य स्नान करावें.

रामनाक—आम्हीं महारामांगाच्या मुलांनींसुद्धां दररोज आंघोळ केली पाहिजे काय?

गुरुजी—होय, तुम्ही दररोज स्नान करीत नाहीं, घाणेरडे वागतां म्हणूनच लोक तुम्हांला शिवत नाहींत. तुम्ही सुद्धां दररोज स्नान करा. सर्व हिंदूंना स्नानाबद्दल धर्माची आज्ञा आहे. स्नानानंतर चंदनाचें गंध प्रत्येक हिंदु पुरुषानें लावावें. स्त्रियांनीं कुंकूं लावावें. गंध आणि कुंकूं या हिंदु स्त्री पुरुषांच्या खुणा आहेत. त्यांत परंपरा आहे, शिष्टाचार आहे आणि धार्मिक संबंधही आहे. मुलांनो, शौच, मुखमार्जन, स्नान, या संबंधाचा शौचाचार तुम्हांला समजला काय?

मुलें—होय! आपण सांगितलेला शौचधर्म आम्हांला चांगला समजला.

गुरुजी—मुलानो! स्नानानतर तम्ही आपलीं वस्त्रें म्हणजे धोतर, आग पुसण्याचा पचा नि उपरणें लगेच धुऊन टाकीत जा भिजलेलीं वस्त्रें तशींच कुजत ठेऊ नका. धोतर, पचा असलीं वस्त्रें नेहमा स्वत च धुतलीं पाहिजेत. त्यामुळें कपड्याचें नि ते वापरणाराचें ही आयुष्य वाढतें पूर्वीची पद्धत अशी होती कीं धोतर धुता येऊ लागलें म्हणजेच तें नेसावयास द्यावयाचें लगोटीसुद्धा ज्याला धुता येत नाहीं, त्याला धोतर मिळत नसे आपले कपडे आपण जितक्या काळजीनें धुऊ तितक्या काळजीनें कोणीही धुणार नाहीं स्वच्छ नि चुरचुरीत धोतर नेसल्यानें मनाला एक प्रकारचा प्रसन्नता येते. सुटीच्या दिवशीं तुम्ही तुमचे इतर कपडेसुद्धा साबण लावून स्वत धूत जा

प्रेमचंद—विद्यार्थ्यांनीं परटाकड कपड धुवावयास देऊ नयेत काय

गुरुजी—केव्हा केव्हा द्यावेत गरीबानीं पैस वाचावे म्हणून स्वत कपड धुवावत आणि श्रीमतानीं काम करण्याची सवय राहावी म्हणून कपडे धुवावत पाणी पिण्याचें भांडें, तांब्या, तपेली हीं सुद्धा स्वच्छ घासून ठेवावींत आपलीं भाडीं आपण घासण्यास आळस केला तर अस्वच्छ अथवा उष्ट्या भाड्यानें पाणी प्यावें लागतें तांब्याभांड्याप्रमाणें ताट, वाटा, हीं नित्य तुमचीं तुम्हीच घासावीं विद्यार्थ्यांनीं हाता हाईं तों पर्यंत हीं असलीं स्वच्छतचीं कामें स्वत चीं स्वत च करावीं आपल्या मनाप्रमाणें दुसऱ्याकडून स्वच्छता ठेविली जाणें अशक्य आहे

पुरुषोत्तम—आपण सागितल्याप्रमाणें मी उद्यापासून धोतरें, भाडीं यांबद्दल स्वच्छता ठेवीन.

गुरुजी—अरे, तुम्ही तुमच्या अभ्यासाची खोली सदैव स्वच्छ ठेवली पाहिजे. आठ दिवसा शेणानें खोली स्नत. सारवावी. कोळीष्टकें नि भिंतीवरील घाण हीं काढावीं. पुस्तकें, पेटी, ट्रंक हे पदार्थ स्वच्छ झाडून काहीं वेळ उन्हात ठेवावेत. अंथरूण तर आठ।दिवसां तीन चार तास उन्हात पडू द्यावें. आपल्या खोलींतील उंदरांचीं बिळें बुजवावीं. ढेकूण असले तर ते ही बारकाईनें पाहून पाहून टाकावेत. ढेकणाचीं अडीं खरडून काढावीं. ढेकूण तेथल्या तेथें चिरडूं नयेत. खोलीमध्यें देवाच्या तसबिरी ठेवाव्या. देशभक्तांचीं चित्रें ठेवावीं. विद्यार्थ्यांच्या खोलींतील सर्व वस्तु सुबक, स्वच्छ, नीटनेटक्या नि व्यवस्थित ठेवलेल्या असाव्या. मी तुम्हाला आतां पर्यंत सांगितलेल्या शौचधर्माचें फळ काय आहे; हें तुम्हास ठाऊक आहे काय?

मुलें—नाहीं.

गुरुजी— शौचधर्माचें फळ दीर्घायुष्य हें आहे. तुम्हाला जर शंभर वर्षे जगण्याची इच्छा असेल, तर मी सांगितलेला शौचधर्म पाळा. महाभारतातील अनुशासनपर्वांत एक आयुष्याख्यान आहे. त्यांत अशा तऱ्हेच्या पुष्कळ गोष्टी सांगितलेल्या आहेत. सोवळ्यामध्येंही शुद्धता, स्वच्छता आणि पवित्रपणा ह्याच गोष्टी मुख्य आहेत. शरिराप्रमाणें मन आणि वाणी ह्यांना कसें पवित्र ठेवावें ह्याही विचार महत्वाचा आहे. पण आतां वेळ झाली आहे म्हणून तो विषय मी तुम्हांला पुढच्या पाठांत सांगेन.

---

## आठव्या पाठाची पुरवणी

### अनुशासनपर्व अध्याय १०४

सर्व लक्षणहीनोऽपि । समुदाचारवान्नर
श्रद्धधानोऽनुसूयश्च । शतं वर्षाणि जीवति ॥ १३ ॥
लोष्टमर्दी तृणच्छेदी । नखखादी च यो नरः
नित्योच्छिष्ट संकुसुको । नेहायुर्विन्दते महत् ॥ १९ ॥
कृत्वा मूत्रपुरीषे तु । रथ्यामाक्रम्य वा पुन
पादप्रक्षालनं कुर्यात् । स्वाध्याये भोजने तथा ॥ ४१ ॥
नोत्सृजेत पुरीष च । क्षेत्रे ग्रामस्य चान्तिके
उभे मूत्रपुरीषे तु । नाप्सु कुर्यात्कदाचन ॥ ९७ ॥
मूत्र नोत्तिष्टता कार्यं । न भस्मनि न गोव्रजे
आर्द्रपादस्तु भुञ्जीत । नार्द्रपादस्तु सविशेत् ॥ ६६ ॥
दूरादावसथान्मूत्रं । दूरात्पादावसेचनम्
उच्छिष्टोत्सर्जन चव । दूरे कार्यं हितैषिणा ॥ ८६ ॥
अनायुष्य दिवा स्वप्न । तथाऽभ्युदितशायिता
प्रातर्निशाया च तथा । ये चोच्छिष्टा भवन्तिच ॥ १४९ ॥
उपानहौ च वस्त्रच । धृतमन्यैर्न धारयेत् ॥ २९ ॥

### तैत्तिरीय आरण्यक

नाप्सु मूत्र पुरीष कुर्यात् । न निष्ठीवेत्

### मनुस्मृति अध्याय ४

नात्नमर्यादेकवासा । न नग्न स्नानमाचरेत्
न मूत्र पथि कुर्वीत । न भस्मनि न गोव्रज ॥ ४५ ॥

नाप्सु मूत्रं पुरीषं वा । ष्ठीवनं वा समुत्सृजेत्
अमेध्यलिप्तमन्यद्वा । लोहितं वा विषाणि वा ॥ ५६ ॥
उपानहौच वासश्च । धृतमन्यैर्न धारयेत्
उपवीतमलंकारं । स्रजं करकमेवच ॥ ६६ ॥
लोष्टमर्दी तृणच्छेदी । नखखादीच यो नरः
स विनाशं व्रजत्याशु । सूचकोऽशुचिरेवच ॥ ७१ ॥

## स्नान

उष्णांबुनाधः कायस्य । परिषेको बलावहः
तेनैव चोत्तमांगस्य । बलहृत्केशचक्षुषाम् ॥ वाग्भट ॥
गुणा दश स्नानपरस्य साधो । रूपंच तेजश्च बलंच शौचम्
आयुष्यमारोग्यमलोलुपत्वं । दुःस्वप्नघातश्च तपश्च मेधाः
॥ दक्षस्मृति
गुणा दश स्नानशीलं भजंते । बलं रूपं स्वरवर्णप्रशुद्धिः
स्पर्शश्चगंधश्च विशुद्धताच । श्रीःसौकुमार्यं प्रवराश्चनार्यः
महाभारत

## स्नानप्रशंसा ( योगयाज्ञवल्क्य )

मनःप्रसादजननं । रूपसौभाग्यवर्धनं ।
शोकदुःस्वप्नहं स्नानं । मोक्षदं ल्हादनं तथा ॥
स्नानमूलाः क्रियाः सर्वाः । श्रुतिस्मृत्युदिता नृणाम्
तस्मात्स्नानं निषेवेत । श्रीपुण्यायुष्यवर्धनं ॥
याम्यं हि यातनादुःखं । नित्यस्नायी न पश्यति
नित्यस्नानेन पूयंते । येऽपि पापकृतो जनाः

सत्यव्रत

य ? मय यशो धर्म । ज्ञानमायुः सुखं धृति
आरोग्य परमाप्नोति । सम्यक् स्नानेन मानव ॥

दंतधावनविधी ( वृद्धशातातप )

मुखे पर्युषिते नित्य । भवत्यप्रयतो नर
तस्मात्सर्व प्रयत्नेन । भक्षयेद्दंतधावन ॥

कात्यायन

उत्थाय नेत्रे प्रक्षाल्य । शुचिर्भूत्वा समाहित
परिजप्य च मंत्रेण । भक्षयेद्दंत धावन

समर्थ दासबोध ( १ । २ )

दंतचक्षु आणि घ्राण । पाणि वसन आणि चरण
सर्वकाळ जयाचे मलिन । तो एक मूर्ख ॥ ३५ ॥
उदकामध्यें सांडी गुरळी । पायें पाय कांडोळी
सेवा करी हीन कुळीं । तो एक मूर्ख ॥ ६४ ॥

---

## पाठ नववा.

### शरीर, वाणी नि मन यांचें पावित्र्य.

गुरुजी—मुलांनो, मी तुम्हाला ' शौचधर्म ' या पाठात स्वच्छतेच्या वऱ्याच गोष्टी सांगितल्या त्या सर्व तुमच्या लक्षात आहेत काय ?

मुलें—होय त्या आमच्या चांगल्या लक्षांत आहेत.

**गुरुजी**—आज मी तुम्हाला शरीर, मन आणि वाणी याच्या पवित्रतेविषयीं कांहीं नियम सांगतो.

**त्रया**—शरीराच्या स्वच्छतेंत पवित्रता येत नाहीं काय?

**गुरुजी**—शरीरस्वच्छतेंत थोडा पवित्रपणा आहे, परंतु शरिराकडून कोणतीही वाईट कामें न होऊं देण्यातच शरीराचें खरें पावित्र्य आहे. शरिराकडून आई, बाप, गुरु, देव नि वृद्ध याची सेवा व्हावी, हें मागें सांगितलेंच आहे. त्याप्रमाणेंच विद्वानाची थोर महात्म्याची सेवा शरिराकडून घडली म्हणजे शरिराला आणि अंत:करणाला पवित्रपणा येतो. दुसऱ्यावर उपकार करणें, गोर गरिबाच्या अडीअडचणींत त्याच्या उपयोगीं पडणें, गावातील उत्सवामध्यें नि सार्वजनिक कार्यामध्यें अंग मोडून काम करणें, या सर्व गोष्टी आणि इतर सत्कर्मे केल्यानं शरीर नि मन पवित्र होतें. शरीर नुसतें स्वच्छ ठेविलें आणि बाकी शरीराकडून पाहिजे तसल्या वाईट साईट गोष्टी होऊं दिल्या, तर तें शरीर अपवित्र समजावें. सूर्याला नमस्कार घालणें, आईबापाना वंदन करणें, सरळपणानें वागणें, कोणाचेंही मन न दुखविणं ही एक प्रकारची शरिराची तपश्चर्याच आहे. चकाट्या पिटणें नि पत्ते सोंगट्या खेळत आयुष्य घालविणें, वेळेचा दुरुपयोग करणें हा शरीराचा व मनाचा अपवित्रपणा आहे.

**अमृतलाल**— शरिरामध्यें वाणी येत नाहीं काय? तिची पवित्रता निराळी कशाला सांगावयास पाहिजे?

**गुरुजी**—वाणी हें ज्ञानेंद्रिय तसेंच कर्मेंद्रियही आहे. ती शरिरांत असली तरी मन एका बाजूस आणि कर्मेंद्रिय एका बाजूस

अशी स्थिति आहे. वाणी हा ज्ञानेंद्रिय नि कर्मेंद्रिय यांचा मध्य आहे. म्हणून वाणीलाहि तुम्ही पवित्र ठेवा.

प्रेमचंद—वाणीला कसें पवित्र ठेवावयाचें?

गुरुजी—दुसऱ्याला दु ख होईल असें मर्मभेदक वाक्य कधींही बोलूं नये. सत्य जरी बोलावयाचें झालें तरी तें प्रिय वाटेल अशा शब्दांनीं बोलावें. साखरेचीं पुटें दिलेल्या कोयनेलच्या गोळ्या जशा असतात आणि आत्न कडू असल्या तरी घेताना जशा गोड लागतात तसें बोलण्याचा परिपाठ ठेवावा आपण दुसऱ्याच्या काळजाला घरें पडतील असे शब्द उचारले तर ते दुसऱ्याच्या मनां-तून कधींही जात नाहींत समर्थ म्हणतात ' जगामध्यें जगमित्र । जिव्हेपाशीं आहे सूत्र. ' जगमित्र होण्याचें सगळें सूत्र जिव्हेजवळ आहे. आपण गोड बोललों तर दुसरेही आपल्याशीं गोड बोलतात.

मोरेश्वर—एकाचानें आपणास उगाच शिव्या दिल्या तर त्याला शिव्या द्याव्या काय?

गुरुजी—जशास तसें वागणें हा निसर्गाचा धर्म आहे ध्वनी-प्रमाणें प्रतिध्वनि निघणें, आघाताप्रमाणें प्रत्याघात होणें, हें मानवी स्वभावाशीं विरुद्ध नाहीं परतु आपण होऊन विनाकारण कोणाची आगळीक करणें हें काहीं चांगलें नव्हे समर्थ म्हणतात ' जे दुस-ऱ्यास दु ख करी । ते अपवित्र वैखरी । आपणासहीं घात करी । कोणे एके प्रसगीं ॥ आपणास चिमोटा घेतला । तणें प्राण कासा-वीस झाला । आपणावरोनि दुसऱ्याला । राखत जावें ॥ या ओव्या-प्रमाणें आपल्यावरून दु खाच्या बाबतींत तरी जग ओळखण्यास शिकावें. वाईटसाईट शिव्या, अश्लील शब्द, बीभत्स म्हणी नि

वाक्प्रचार विद्यार्थ्यांनीं उच्चारूं सुद्धा नयेत. वाणीची पवित्रता राहावी म्हणून नेहमीं चागले उतारे, गीता आणि ईश्वरनामस्मरण हीं म्हणावीं. खरें बोलणें, अपशब्दोचार न करणें, शिवीगाळ न करणें, गोड बोलणें, चागल्या ग्रंथाचें मोठ्यानें वाचन करणें हे सगळे वाणीच्या पवित्रपणाचे प्रकार आहेत.

गंगू— आतां मनाचा पवित्रपणा कसकसा ठेवावा हें सागा.

गुरुजी—मन नेहमी प्रसन्न ठेविणें हेंच खरोखरी मनाचें पावित्र्य होय. मनाची प्रसन्नता राहण्याकरिता सदैव चागले विचार डोक्यात वागविले पाहिजेत वाईट विचार, कुकल्पना यांचें वास्तव्य मनात असलें म्हणजे मनाची प्रसन्नता कधींही राहणार नाहीं. मन प्रसन्न राहण्याकरिता, चागलीं चागलीं पुस्तकें वाचलीं पाहिजेत, चागल्या गोष्टी ऐकल्या पाहिजेत आणि शरिराकडून चागलींच कामें करून घेतलीं पाहिजेत. मन जर पवित्र ठेवावयाचें असेल तर तुम्ही विद्यार्थिदशेमध्यें नाटकें नि कादंबऱ्या यांचें वाचन करू नये. नाटकें पाहू नयेत, सिनेमाही पाहू नये आणि तमाशाचें तर नावच काढू नये.

रामनाक—आमच्या म्हारवाड्यात नेहमी तमाशे होतात. त्यात वाटेल तसलीं गाणीं असतात आणि बायका पुरुष सगळे ऐकत असतात.

गुरुजी—तमाशासारखा बुद्धिभ्रष्ट करणारा विषय नाहीं. तमाशा म्हणजे तमोगुणाची आशा. नाश व्हावा, जन्माचें वाटोळें व्हावें असें ज्यास वाटत असेल त्यानें तमाशाचे नादीं लागावें. तमाशांत बदकर्माच्या गोष्टी असतात. प्रत्यक्ष स्त्री नि पुरुष अत्यत गलिच्छ

असे हात वारे नि शब्दप्रयोग करितात. तमाशांतील गाणीं इतकीं वाईट असतात कीं विद्यार्थ्यांनीं तीं कधींच ऐकूं नयेत. विद्यार्थी जर तमाशाला गेले तर घाणेरडीं गाणीं चटकन् त्यांच्या ध्यानात राहतात नि तींच गुणगुणण्याची संवय लागते. डोळ्यापुढेंही तमाशांतील देखावे उभे राहतात. त्यायोगें मन, वाणी नि शरीर यांचें पावित्र्य नाहींसें होतें.

कृष्णा—नाटकें कां पाहूं नयेत ?

गुरुजी—नाटकामध्यें बराचसा चावटपणा असतो. शृंगाररसाचे अनेक हावभाव असतात त्यांचा विद्यार्थ्यांच्या मनावर वाईट परिणाम होतो. म्हणूनच भगवान् मनूंनीं नर्तन, वादन, गायन, हीं वर्ज्य करावीं असें सांगितलें आहे. विद्यार्थिदशेमध्यें नाटकें पाहिलीं असता त्याचे परिणाम चांगलें होत नाहींत, असेंच आजवर अनुभवास आलें आहे. नाटकें तर राहोतच. परंतु चावटपणानें भरलेलें कीर्तन किंवा पुराणही विद्यार्थ्यांनीं ऐकूं नये.

रामनाक—नाटकें जर पाहावयाचीं नाहींत तर मग तीं करतात तरी कशाला ?

गुरुजी—नाटकें हीं मोठ्या माणसाकरिता असतात. नाटकाचा उद्देश करमणूक नि मनोरंजन हा असतो. मनुस्मृतीच्या दुसऱ्या अध्यायात ' नर्तनगीतवादनं ' वर्जयेत् असें म्हटलें आहे. गायन वादन, नाचणें, स्त्रियाकडे टक लावून पाहाणें, शृंगाररसाचे आविर्भाव पाहाणें या सर्व गोष्टी नाटकात घडतात. त्या तर ब्रह्मचर्याला अपायकारक आहेत म्हणून तुम्ही नाटकें बिलकुल पाहूं नयेत. विद्यार्थ्यांकरिता म्हणजे त्याना उद्देशून उपयुक्त गोष्टी सांगण्या-

करितां नाटकें क्वचितच लिहिलेलीं असतात. लोकांची करमणूक करावी नि पैसे मिळवून पोट भरावें एवढाच नाटकांचा उद्देश असतो. म्हणून विद्यार्थ्यांनीं नाटकें पाहूं नयेत आणि वाचूं पण नयेत. नाटकापासून आणखी एक मोठा तोटा आहे तो कोणाच्या ध्यानांत येतो काय ?

कृष्णा—जाग्रण होतें, पैसे जातात हाच ना तोटा ?

गुरुजी—तो तर आहेच. खेरीज नाटकांमध्यें लहान लहान मुलें कामें करणारीं असतात. प्रेक्षक लोक त्या मुलांच्या कामाचें कौतुक करितात, तें पाहून कांहीं कांहीं मुलांना नाटकांत जावेंसें वाटतें. नाटकांतल्या मुलांची संगति धरावी, नाटकें फुकट पाहावीं, नाटकी चेष्टा, नाटकी आविर्भाव करावे अशी खोड पुष्कळ विद्यार्थ्यांना लागते. अभ्यास नको, उनाडकी पाहिजे, अशा मुलांना गांवांत नाटक कंपनी आली कीं एक पर्वणीच आली असें वाटतें. गोरींगोमटीं नि चांगल्या आवाजाचीं मुलें नाटकांच्या नादानें अभ्यास सोडून नाटकांत गेल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. तात्पर्य, नाटक नि सिनेमा पाहण्याचें व्यसन विद्यार्थिदशेंत फार घातुक आहे.

रामनाक—सिनेमासुद्धां इतका वाईट आहे काय ?

गुरुजी—कांहीं कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं नाटक वरें पण सिनेमा नको ! सिनेमामध्यें एकदम उजेड नि एकदम अंधेर असें वरचेवर होत असल्यामुळें त्याचा डोळ्यांवर फार वाईट परिणाम होतो. सिनेमांतील सर्व हालचाली प्रत्यक्ष करून दाखविण्यांत येत असतात म्हणून त्याचाही मनावर वाईट परिणाम होतो. सिनेमांतील चित्रें पाहून कोणी कोणी चोरी करण्यास शिकतात, कोणी

दुसरेच कांहीं भलतेसलते प्रकार करण्यास शिकतात, असें अनुभवास आलें आहे. मनाचें पावित्र्य रक्षण व्हावें, दीर्घायुष्याची प्राप्ति व्हावी, ब्रह्मचर्यधर्माचें पालन व्हावें अशी जर तुमची इच्छा असेल तर वरील गोष्टी अवश्य लक्षांत ठेवा.

प्रेमचंद—नाटकें बिलकूल पाहूं नयेत काय? आमच्या शाळेच्या वार्षिक उत्सवांत दरसाल विद्यार्थीच नाटकें करीत असतात.

गुरुजी—विद्यार्थिधर्माप्रमाणें नाटकें बिल्कुल पाहूं नयेत. शाळेंतसुद्धा जी नाटकें करण्याची पद्धत आहे ती वाईटच आहे. चांगलें नाटक असलें, कंपनी चांगली असली, तुमचे पालक आणि गुरु हे बरोबर असले तर केव्हांतरी म्हणजे वर्षांतून एखादे वेळेस नाटकास गेलां तर चालेल. पण न जाणें हेंच उत्तम. विद्यार्थ्यांनीं जशीं नाटकें पाहूं नयेत आणि वाचूं नयेत, तशाच कादंबऱ्याही वाचूं नयेत.

ग्यानबा—कां? कादंबऱ्या वाचिल्यानें काय होतें?

गुरुजी—जी नाटकांची अवस्था तीच कादंबऱ्यांची. कादंबऱ्यांत तर चावटपणाला पूर आलेला असतो. कोणीतरी एक नायक नि कोणीतरी एक नायिका यांचें लग्न लावून देण्यांतच बहुतेक कादंबऱ्यांचा शेवट झालेला असतो आणि असल्या कादंबऱ्या वाचल्या की ब्रह्मचारी विद्यार्थ्यांच्या मनावर त्याचे अनिष्ट संस्कार होतात.

गंगू—आमच्या घरीं आमच्या काकांना कादंबऱ्या वाचण्याचा भारी नाद म्हणून माझी आजी त्यांना एक सारखी बोलत असते.

गुरुजी—कादंबऱ्यांची भाषा चुरचुरीत असते, म्हणून त्या

वाचाव्याशा वाटतात. मनुष्य एकदां कादंबऱ्या वाचूं लागला कीं त्याचें डोकें दुसऱ्या गहन आणि शास्त्रीय विचारांत शिरत नाहीं. बुद्धीची खोली कमी होते आणि अभ्यासाकडेही दुर्लक्ष होतें.

रामचंद्र—सगळ्याच कादंबऱ्या वाईट असतात काय?

गुरुजी—नाहीं. परंतु बहुतेक कादंबऱ्या विद्यार्थ्यांनीं न वाचण्यासारख्याच असतात. 'गड आला पण सिंह गेला' 'उषःकाल' 'छत्रसाल' 'मी' अशा तऱ्हेच्या बऱ्याच चांगल्या कादंबऱ्या आहेत. परंतु मुलांनो, तुम्ही कोणत्या कादंबऱ्या वाचाव्या हें आधीं गुरुजनाना विचारा आणि मग वाचा. त्या सुटीमध्येंच वाचा. अभ्यासाच्या वेळीं कादंबऱ्या वाचणें कांहीं ठीक नव्हे. मनांत वाईट विचार येण्याला कादंबऱ्या, नाटकें, सिनेमा यांच्यासारखे दुसरे पुष्कळ वाईट विषय आहेत. त्या सर्व विषयांपासून तुम्ही दूरच असलें पाहिजे. विद्यार्थी आपल्या कर्तव्यांत गढलेला असला म्हणजे मग त्याला हे मोह कांहीं करूं शकत नाहींत. मौन, आत्मसंयमन हे प्रकार पावित्र्याकरितां सांगितलेले आहेत. हें सर्व लक्षांत ठेवून तुम्ही तसें वागण्याचा प्रयत्न करा.

## नवव्या पाठाची पुरवणी.

### आपस्तंब धर्मसूत्र प्रश्न १ खंडिका २

अनृत्तदर्शी ॥ ११ ॥ सभाः समाजांश्चागंता ॥ १२ ॥
अजनवादशीलः ॥ १३ ॥ रहःशीलः ॥ १४ ॥
स्त्रीभिर्यावदर्थसंभाषी ॥ १६ ॥ मृदुः ॥ १७ ॥ शांतः ॥ १८ ॥

दान ॥ १९ ॥ ह्रीमान् ॥ २० ॥ धृति ॥ २१ ॥
आर्जव ॥ २२ ॥ अक्रोधन ॥ २३ ॥ अनसूया ॥ २४ ॥

मनुस्मृति अध्याय २

अभ्यङ्गमञ्जनं चाक्ष्णोरुपानच्छत्रधारणम् ।
कामं क्रोधं च लोभं च नर्तनं गीतवादनम् ॥ १७८ ॥
द्यूतं च जनवादं च परिवादं तथानृतम् ।
स्त्रीणां च प्रेक्षणालम्भमुपघातं परस्य च ॥ १७९ ॥

---

## पाठ दहावा.

### ब्रह्मचर्याची महती.

गुरुजी—मुलांनो, भगवान् मारुतिरायांचें चरित्र तुम्हांला ठाऊक आहे काय?

गोविंद—थोडें थोडें माहित आहे. मारुतिरायांनीं सीतेचा शोध लाविला, द्रोणागिरी आणिला, रावणाची लंका जाळिली एवढ्याच गोष्टी मला माहीत आहेत.

गुरुजी—रामायणामध्यें श्री मारुतिरायांचें चरित्र फार चांगलें सांगितलें आहे. मारुतिराय हे प्रभु रामचंद्राचे एकनिष्ठ सेवक होते. सुग्रीवाचें आणि रामचंद्राचें सख्य मारुतिरायांच्या मध्यस्थीनें-च झालें. हिंदुस्थानाच्या दक्षिण टोंकाला मारुतिराय गेले. तेथें त्यांना कित्येक योजनें विस्तीर्ण असा अफाट समुद्र लागला पण एवढा मोठा समुद्र ओलांडून मारुतिराय गेले.

रामनाक—एवढी मोठी शक्ति मारुतिरायांच्या ठिकाणीं कोठून आली?

गुरुजी—मारुतिराय हे ब्रह्मचारी होते नि रामचंद्राचे एकनिष्ठ सेवक होते. त्यामुळेंच त्यांच्या ठिकाणीं एवढी मोठी शक्ति आली.

गंगू—समुद्र ओलांडल्यावर मारुतिरायांनीं काय काय केलें.

गुरुजी—मारुतिरायांनीं नंतर लंकेंतील घरन्घर तपासलें. खूप शोध करितां करितां अशोक वनांत सीता आहे असें त्यांना आढळलें. श्रीरामचंद्रांनीं दिलेली खुणेची आंगठी सीतेपुढें ठेवून 'मातुःश्री आपण काळजी करूं नका' असें ते म्हणाले. मारुतिरायांनीं मनांत असा विचार केला कीं येथून नुसतें परत जाऊं नये. कांहीं तरी चमत्कार करून जावें. म्हणून त्यांनीं थकल्याभागल्यामुळें आपणांस फार भूक लागली आहे असें सीतादेवीस सांगितलें. सीतादेवीनें मारुतिरायाना झाडाखालीं पडलेलीं फळें खाण्याची आज्ञा केली. मारुतिरायांनीं 'पडल्या फळांची आज्ञा' घेऊन रावणाच्या बागेंतील झाडें बरींच उपटून तीं सर्व जमिनीवर झोडपिलीं आणि खालीं पडलेलीं फळें यथेच्छ खाल्लीं. बागेचा रक्षक जंबू माळी मारुतिरायांच्या अंगावर धावून आला. त्याला त्यांनीं खरपूस चोप देऊन ठार केला. रावणाचे दूत मारुतिरायाना पकडण्याकरितां आले. मारुतिराय कांहीं केल्या त्यांस सांपडेनात. शेवटीं मजा करावी म्हणून ते त्यांच्या हातीं सांपडले. रावणासमोर आपल्या शेपटीचें उंच असें आसन करून मारुतिराय बसले आणि एवढा मोठा चौदा चौकड्यांचा राजा जो रावण त्याची त्यांनीं निर्भर्त्सना केली. त्यामुळें रावण खवळला. रावणानें मारुतीच्या शेपटाला चिंध्या गुंडाळून तेल ओतून तें

जाळण्याम सांगितलें. मारुतिरायांनी आपल्या शेपटीचा असा काहं चमत्कार दाखविला कीं त्यामुळें रावणाची सर्व लंका गडबडली श्रीसमर्थांनीं मारुतिरायाच्या या पुच्छप्रतापाचें फार मजेदार वर्णन केलें आहे

कृष्णा—गुरुजी, तें वर्णन आम्हांला समजण्यासारखें असल्यास सांगा.

गुरुजी—त्या वर्णनांतील दोन चार श्लोक नमुन्यादाखल सांगतों, ऐका—

मुलां लेंकुरां मारि तें खेळताहे । निजेल्या मधें पुच्छ तें लोळताहे ॥
कुमारी कुमारा गळां हार घाली । भयाभीत अंतापुरीं हाक जाली ॥३३॥
अकस्मात तें काय होतें कळेना । चळेना ढळेना कदा आकळेना ।
सभेमाजि रायापुढें हाक गेली । अहो पाहतां काय लंका बुडाली ॥३४॥
भयाभीत ते सर्वही लोक झाले । निकूराचळीं सर्प ऊदंड आले ।
कळेना बरें सर्प कीं काय आहे । करी तें महामार त्याचा न साहे ॥३५॥
सभामंडपीं गुदगुल्या तो करीतो । मुखें नासिकें कर्ण उंदूनि नेतो ।
बळें गाल सर्वांग तो चर्चडीतो । चिरे वोटितो फाडितो गुर्गुरीतो ॥४१॥

बया—श्लोक अगदीं पोट धरधरून हासण्यासारखेच आहेत.

गुरुजी—मारुतिरायांनीं पहिल्यानें अशी मजा केली नंतर त्यांनीं शेपटीला चिंध्या बांधू दिल्या, तेल घालूं दिलें नि आगही लावू दिली. मारुतिरायांना तेंच पाहिजे होतें शेपटीला आग लाविल्याबरोबर उडून घराघरावर बसून त्याच शेपटीनें त्यांनीं सबंध लंका जाळली लंकेंत हाहाकार उडवून दिला आणि रावणाला सळो का पळो असें करून ते परत आले

अमृतलाल--मारुतिराय परत आल्यावर रामचंद्रांना आनंद वाटला असेल नाहीं ?

गुरुजी--श्रीरामचंद्रांना फार आनंद वाटला, सेतु बांधून सर्व वानरदळासह ते लंकेला गेले. रावणाशीं मोठें तुंबळ युद्ध केलें आणि त्याचा पराभव केला. रावणाचा मुलगा इंद्रजित यानेंच लक्ष्मणावर शक्ति फेंकून त्याला मूर्च्छित केलें. त्या वेळीं मारुतिरायानीं द्रोणागिरी आणिला नि त्या पर्वतावरील औषधीनें लक्ष्मणाला वांचविलें. मारुतिरायांची योग्यता सर्वांमध्यें जांबवान्च चांगली जाणीत होता.

शान्तशील--हें कसें काय ? रामचंद्र जाणीत नव्हते काय ?

गुरुजी--रामचंद्र तर जाणीत होतेच, पण जांबवान् हा वृद्ध म्हातारा मारुतिरायाच्या पराक्रमाची खरी किंमत जाणीत होता. युद्ध चाललें असता एकदां रावणाकडील सैन्याचा मोठा मारा झाला. त्यामुळें श्रीरामचंद्र, लक्ष्मण, मारुतिराय असे सगळे मोठमोठे योद्धे बेशुद्ध होऊन मेल्यासारखे पडले. त्या वेळीं जांबवान् आणि बिभीषण हे लवकर शुद्धीवर आले. जांबवान् बिभीषणाला विचारितो कीं ' मारुति जिवंत आहे ना ? ' बिभीषण म्हणाला ' रामलक्ष्मणांची चौकशी न करितां मारुतीविषयींच कां विचारतोस ? ' तेव्हां जांबवान् म्हणतो, ' अरे रामलक्ष्मणांचीसुद्धा भिस्त मारुतीवरच आहे. हें पहा ' अस्मिन् जीवति वीरे तु हतमप्यहतं बलं । हनूमत्यु ज्झितप्राणे जीवन्तोऽपि मृता वयम् ॥ (वाल्मीकि रामायण.) हा वीर जर जिवंत असेल तर ठार झालेलें सैन्यही जिवंत आहे असें समज. पण हनुमान जर मेला तर आम्ही सर्व जिवंत असून मेल्यासारखेच

आहेत. सारांश रामायणांतील मुख्य पराक्रमाचा भाग ब्रह्मचारी मारुतिरायांचाच आहे. मारुतिरायांचा पराक्रम जर रामायणांत नसता तर खरोखर रामायण हें अळणी लागलें असतें. मोरोपंत म्हणतात-

' या त्वत्पराक्रमाविण पळभरि येती न खळ वळें वळणीं
श्रीमद्रामायणरस रसिकाला स्पष्ट लागता अळणी ॥ '

' या प्लवगांत तुवांची व्रत मुख्य ब्रह्मचर्य जागविलें
वागविलें मन योगीं जगदुपकारार्थ देह भागविले ॥ '

मारुतिराय जर नसते, तर राक्षस वठणीला आले नसते. सर्व व्रतांत मुख्य व्रत जें ब्रह्मचर्य तें पाळून जगावर उपकार करण्याकरितां मारुतिरायांनीं आपला देह झिजविला. त्यांची योग्यता कोठवर वर्णावी ! मुलांनो, तुम्ही दररोज सायंकाळीं मारुतिरायांचें ध्यान करा आणि श्रीसमर्थांनीं केलेलें *' भीमरूपी महारुद्रा '* हें स्तोत्र म्हणत चला.

**वया**—कांहीं कांहीं लोक शनिवारचा उपास करितात तो काय म्हणून ?

**गुरुजी**—शनिवार हा वार मारुतिरायांचा आहे. मारुतिरायांची कृपा असावी असें ज्यांना वाटतें ते सर्व दिवसभर उपास करून सायंकाळीं स्नान करून मारुतीची पूजा करून जेवतात. मारुतिराय हीं बलाची देवता आहे. त्यांनीं बुद्धिबल आणि शरीरबल या दोहोंचेंही संपादन केलें होतें. मारुतिरायांच्या चातुर्याचें वर्णन रामायणांत ठिकठिकाणीं केलें आहे. तुम्ही विद्यार्थी आहांत, ब्रह्मचारी आहांत म्हणून शरीरबल नि बुद्धिबल प्राप्त व्हावें म्हणून मारुतिरायांची उपासना करा.

**रामनाक**---तालमींत मारुतीचीच मूर्ति ठेवितात ती कां ?

**गुरुजी**---जोर, जोडी, मलखांब, कुस्ती करून शरीरबल संपादण्याकरितां तालमींत यावयाचें असतें. मारुति ही बलदेवता आहे. सर्व प्रकारचें बल देण्याचे सामर्थ्य मारुतिरायांच्या अंगांत आहे, म्हणून त्यांची मूर्ति तालमींत ठेवण्यांत येते.

**कृष्णा**---मारुतिरायासारखे आणखी कोणी ब्रह्मचारी झाले काय ?

**गुरुजी**---होय, मी फक्त तुम्हांला राजर्षिभीष्म आणि समर्थ रामदासस्वामी यांची थोडी माहिती सांगतों. मारुतिरायांचा पराक्रम रामायणांतून काढून टाकिला तर तें जसें अळणी लागेल, तसेंच भीष्माचें चरित्रही महाभारतांतून वगळलें तर महाभारतही पाचट लागेल. मुलांनो, रामायणांत जी मारुतिरायांची योग्यता, भारतांत जें भीष्मचरित्राचें महत्त्व, तेंच महत्व महाराष्ट्राच्या इतिहासांत श्रीसमर्थ रामदास यांचें आहे. श्रीसमर्थांची महनी, कार्य, व्याप, आक्रम, आटोप, जर महाराष्ट्राच्या इतिहासांतून वगळला तर तो इतिहासही अगदी नीरस लागेल.

**संतोबा**---महाभारतांत राजर्षि भीष्मांची योग्यता फार मोठी आहे असें आपण म्हणतां तर त्यांचें चरित्र सांगा बरें ?

**गुरुजी**---आतां मी भीष्मचरित्र सागतों तें ऐका. वडिलाचें नांव शांतनु नि आईचें नांव गंगा असें होतें. म्हणून भीष्मांना शाननव आणि गांगेय अशीं नांवें आहेत. गंगेचें शंतनूशीं जेव्हां लग्न झालें तेव्हां तिनें शंतनूशीं अशी बोली केली होती कीं मीं कांहीं केलें तरी तुम्ही मला बोलतां कामा नये. शंतनूनें लग्नाच्यावेळीं तें तिचें म्हणणें मान्य [illegible]

आहेत सारांश रामायणातील मुख्य पराक्रमाचा भाग ब्रह्मचारी मारुतिरायाचाच आहे. मारुतिरायाचा पराक्रम जर रामायणात नसता तर खरोखर रामायण हें अळणी लागलें असतें मोरोपत म्हणतात-

' बा त्वत्पराक्रमाविण पळभरि येती न खळ बळें वळणीं
श्रीमद्रामायणरस रसिकाला स्पष्ट लागता अळणी ॥ '
बा प्रुवगांत तुवाची व्रत मुख्य ब्रह्मचर्य जागविलें
वागविलें मन योगीं जगदुपकारार्थ देह भागविले ॥ '

मारुतिराय जर नसते, तर राक्षस वठणीला आले नसते सर्व व्रतांत मुख्य व्रत जें ब्रह्मचर्य तें पाळून जगावर उपकार करण्याकरिता मारुतिरायानीं आपला देह झिजविला. त्याची योग्यता कोठवर वर्णावी ? मुलानो, तुम्ही दररोज सायकाळीं मारुतिरायाचें ध्यान करा आणि श्रीसमर्थांनीं केलेलें ' भीमरूपी महारुद्रा ' हें स्तोत्र म्हणत चला.

नया—काहीं कांहीं लोक शनिवारचा उपास करितात तो काय म्हणून ?

गुरुजी—शनिवार हा वार मारुतिरायाचा आहे मारुतिरायाची कृपा असावी असें ज्याना वाटतें ते सर्व दिवसभर उपास करू सायकाळीं स्नान करून मारुतीची पूजा करून जेवतात मारुतिराय ही बलाची दवता आह त्यानीं बुद्धिबळ आणि शरीरबळ दाहोंचेंही सपादन केलें हातें. मारुतिरायाच्या चातुर्याचें [illegible] व रामायणात ठिकठिकाणीं केलें आहे तुम्ही विद्यार्थी आहात, [illegible] चारी आहात म्हणून शरीरबळ नि बुद्धिबळ प्राप्त व्हावें म्हणून मारुतिरायाची उपासना करा

रामनाक—तालमींत मारुतीचीच मूर्ति ठेवितात ती कां ?

गुरुजी—जोर, जोडी, मलखांब, कुस्ती करून शरीरबळ संपादण्याकरितां तालमींत यावयाचें असतें. मारुति ही बळदेवता आहे. सर्व प्रकारचें बळ देण्याचें सामर्थ्य मारुतिरायांच्या अंगांत आहे, म्हणून त्यांची मूर्ति तालमींत ठेवण्यांत येते.

कृष्णा—मारुतिरायासारखे आणखी कोणी ब्रह्मचारी झाले काय ?

गुरुजी—होय, मी फक्त तुम्हांला राजर्षिभीष्म आणि समर्थ रामदासस्वामी यांची थोडी माहिती सांगतों. मारुतिरायांचा पराक्रम रामायणांतून काढून टाकिला तर तें जसें अळणी लागेल, तसेंच भीष्माचें चरित्रही महाभारतांतून वगळलें तर महाभारतही पांचट लागेल. मुलांनो, रामायणांत जी मारुतिरायांची योग्यता, भारतांत जें भीष्मचरित्राचें महत्त्व, तेंच महत्त्व महाराष्ट्राच्या इतिहासांत श्रीसमर्थ रामदास यांचें आहे. श्रीसमर्थांची महती, कार्य, व्याप, आक्रम, आटोप, जर महाराष्ट्राच्या इतिहासांतून वगळला तर तो इतिहासही अगदी नीरस लागेल.

संतोबा—महाभारतांत राजर्षि भीष्मांची योग्यता फार मोठी आहे असें आपण म्हणतां तर त्यांचें चरित्र सांगा बरें ?

गुरुजी—आतां मी भीष्मचरित्र सांगतों तें ऐका. वडिलांचें नांव शांतनु नि आईचें नांव गंगा असें होतें. म्हणून भीष्मांना शान्तनव आणि गांगेय अशीं नांवें आहेत. गंगेचें शंतनूशीं जेव्हां लग्न झालें तेव्हां तिनें शंतनूशीं अशी बोली केली होती कीं मी कांहीं केलें तरी तुम्ही मला बोलतां कामा नये. शंतनूनें लग्नाच्यावेळीं तें तिचें म्हणणें मान्य केलें. शंतनूपासून पुढें गंगेला मुलें होऊं

लागली. तिनें मूल जन्मास आलें की त्याला पाण्यांत टाकावें, असें करून सात मुलगे मारिले. आठव्या मुलालाही गंगा जेव्हां पूर्वीप्रमाणें पाण्यांत बुडवूं लागली, तेव्हां शंतनु राजा रागावून म्हणाला ' हे पुत्रघ्नि, एवढें तरी पोर मारूं नकोस. तें ऐकून गंगा रागावली आणि पूर्वीचा ठराव मोडल्यामुळें ती निघून गेली. गंगेचा आठवा मुलगा भीष्म हा होय. मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात या म्हणीप्रमाणें व्हानपणींच भीष्मांची बुद्धिमत्ता, कुशलता, आणि पराक्रम हे गुण दिसूं लागले. भीष्म जसजसें प्रौढ होऊं लागले, तसतसे त्यांना राज्यकारभाराचें शिक्षण वडिलांपासून मिळालें. गंगेनें त्यांस भगवान् परशुरामापासून विद्या शिकविली. पुढें एका दाशराजाची मुलगी सत्यवती इच्याशी लग्न करावें असें शंतनूला वाटलें. सत्यवतीच्या बापानें आपल्या मुलीच्या संततीलाच राज्य मिळेल तर मुलगी देईन, असं सांगितल्यामुळें शंतनूनें भीष्मांना विचारिलें. भीष्म म्हणाले, " कांहीं हरकत नाहीं. मी सत्यवतीच्या मुलांनाच गादीवर बसवून राज्यकारभार चालवीन. आपण खुशाल लग्न करून घ्या. " पण सत्यवतीच्या बापाचें एवढ्यानें समाधान होईना. तो म्हणाला भीष्म स्वतः राज्यावरचा हक्क सोडील, पण उद्यां भीष्माचे मुलगे सत्यवतीच्या पुत्रांपासून राज्य हिसकावून घेतील! तें ऐकतांच शंतनूला पंचाईत पडली. तें पाहून आपल्या पित्याची आणि सत्यवतीच्या बापाची काळजी दूर करावी म्हणून भीष्म म्हणाले हे राजा, हे दाशराजा, हे भूमिपालहो, मी काय म्हणतों तें ऐका. राज्याचा तर मीं पूर्वींच त्याग केला आहे. माझीं मुलें राज्य हिस-

व्हावी म्हणून मी आजपासून आजन्म ब्रह्मचारीच राहीन, अशी प्रतिज्ञा करितों.

> दाशराज निबोधेदं वचनं मे नृपोत्तम ॥ १०६ ॥
> शृण्वतां भूमिपालानां यद्ब्रवीमि पितुःकृते
> राज्यं तावत्पूर्वमेव मया त्यक्तं नराधिपाः ॥ १०७ ॥
> अपत्यहेतोरपिच करिष्येऽद्य विनिश्चयम्
> अद्यप्रभृति मे दाश ब्रह्मचर्यं भविष्यति ॥ १०८ ॥
>
> आदिपर्व अध्याय १०७

ग्यानबा—अरे बापरे काय ही भयंकर प्रतिज्ञा !

गुरुजी—भीष्मांचीं मूळचीं नावें देवव्रत, गांगेय, शांतनव अशीं होतीं, त्यांनीं ही भयंकर प्रतिज्ञा केल्यामुळें त्यांना भीष्म म्हणजे भयंकर प्रतिज्ञा करणारा असें नांव प्राप्त झालें. भीष्मांची ती प्रतिज्ञा ऐकून सर्व लोक आणि देव थक्क झाले. शंतनुराजाला तर अतिशय आश्चर्य वाटलें आणि त्यानें त्या प्रतिज्ञेबद्दल ' भीष्मा, तूं स्वच्छंद-मरणी होशील ' असा वर दिला.

गंगू—स्वच्छंदमरणी म्हणजे काय !

गुरुजी—स्वच्छंदमरणी म्हणजे इच्छामरणी. इच्छेला येईल तेव्हां मरावयाचें, इच्छा नसेल तर मृत्यूला ' चालता हो ' असें सांगण्याचें सामर्थ्य या वरानें भीष्मांना मिळालें. पुढें भारतीय युद्धाचे वेळीं भीष्म हेच कौरवांचे पहिले सेनापति होते. युद्धांत त्यांचा पराभव झाला आणि ते शरपंजरी म्हणजे बाणांच्या अंथरुणावर पडले. त्यावेळीं दक्षिणायन होतें म्हणून भीष्मांना मरूं नये

असें वाटलें. पुढें लवकरच उत्तरायण आलें त्यावेळीं भीष्मांनीं अत्यंत शान्त चित्तानें आपला प्राण सोडला.

रामनाक—दक्षिणायन आणि उत्तरायण म्हणजे काय?

गुरुजी—याचें उत्तर मी पंचांगाच्या पाठांत देईन. असो. भीष्म हे प्रतिज्ञा केल्याप्रमाणें आजन्म ब्रह्मचारी राहिले. राज्याच्या त्यानीं अनेक उलाढाली केल्या शेवटीं इच्छेप्रमाणें मृत्यु स्वीकारला भीष्मांच्या ठिकाणीं एवढें जें सामर्थ्य आलें तें ब्रह्मचर्य व्रतामुळेंच होय.

प्रेमचंद—भीष्मांच्या ज्ञानाची थोडी माहिती सांगाल तर बरें

गुरुजी—भीष्मांचें ज्ञान अगाध होतें महाभारतांतील शांति पर्वांत आणि अनुशासनपर्वांत धर्मराजाला भीष्मांनीं किती तरी निरनिराळ्या शास्त्रांचें ज्ञान सांगितलें आहे. धर्म, नीति, आचार, वर्ण, आश्रम, अर्थशास्त्र, युद्धशास्त्र, राजनीतिशास्त्र, आपद्धर्म असे कितीतरी विषय, आख्यानें आणि उपाख्यानें यानीं मिश्रित करून सांगितले आहेत. तुम्ही मोठे झाल्यावर किंवा आतां सुद्धा भाषांतरावरून तीं गोष्टीसारखीं आख्यानें केव्हां केव्हां वाचत जा

रामचंद्र—गुरुजी, भगवान् मारुतिराय आणि राजर्षि भीष्म यांच्या ब्रह्मचर्यव्रताची आणि चरित्राची आम्हाला कल्पना आली आतां श्रीसमर्थ रामदास स्वामींबद्दल सांगतां ना?

गुरुजी—होय, श्रीसमर्थ रामदासस्वामी यांचा जन्म गोदा तटाकीं जांब नांवाच्या गांवीं झाला. त्यांच्या वडिलांचें नाव सूर्याजीपंत नि आईचें नांव राणूबाई. व्हानपणापासून समर्थांचें लक्ष देवधर्माकडे होतें. आठव्या वर्षीं त्यांची मुंज झाली नंतर त्या वेळच्या

चालीप्रमाणें बाराव्या वर्षी त्यांचें लग्नही ठरलें. पण समर्थांना आजन्म ब्रह्मचारी राहून मारुतिरायांची कृपा संपादून जगदुद्धार करावयाचा होता, म्हणून ते लग्नसमारंभांतून पळाले. त्यांनीं बारा वर्षे तपश्चर्या केली, बारा वर्षे देशपर्यटन केलें आणि सामर्थ्य संपादन केलें. वयाच्या छत्तिसाव्या वर्षी समर्थ सातारा प्रांतांतील चाफळ-खोऱ्यांत आले आणि महाराष्ट्र धर्माची स्थापना करण्यास त्यांनीं सुरुवात केली. तीनशें वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत मुसलमानांनीं अत्यंत धुमाकूळ मांडला होता. समर्थांना देवाचें–रामाचें–राज्य स्थापावयाचें होतें. त्यांनीं ठिकठिकाणीं शिष्य पाठविले, मठ स्थापिले आणि निर्बल झालेल्या लोकांमध्यें बल उत्पन्न व्हावें म्हणून जिकडे तिकडे मारुतीची उपासना चालू केली. समर्थांनीं ब्रह्मचर्यव्रताच्या जोरावर दीर्घायुष्य संपादन करून महाराष्ट्राला जागें करून छत्रपति शिवाजी-महाराजांना जें बहुमोल साह्य केलें तें जर केलें नसतें तर महाराष्ट्राला फार वाईट स्थिति प्राप्त झाली असती. श्रीसमर्थ हे अलीकडच्या काळांतील मारुतिरायच होत. त्यांनीं महाराष्ट्राच्या इतिहासांत अपूर्व कामगिरी केली आहे. मुलांनो, ब्रह्मचर्याचीं तीन उदाहरणें मी तुम्हांपुढें ठेविलीं आहेत. तुम्ही त्यांच्या चरित्रांचें नीट मनन करा. चैत्र शुद्ध पूर्णिमा, माघ शुद्ध अष्टमी, आणि माघ वद्य नवमी हे तीन दिवस भगवान् मारुतिराय, राजर्षि भीष्म आणि समर्थ रामदासस्वामी यांच्याकरितां पवित्र म्हणून पाळीत जा. तुम्ही विद्यार्थीदशेंत दररोज त्यांचें स्मरण करा आणि त्यांच्याप्रमाणें आपल्या हातूनही महत्कार्यें व्हावींत अशी नित्य ईश्वराची प्रार्थना करा.







## पाठ अकरावा.

### अन्न.

**गुरुजी**—गेल्या पाठात ब्रह्मचर्याचें महत्त्व किती आहे हें मी तुम्हाला सागितलें. वयाच्या पंचवीस वर्षांपर्यंत विद्यार्थिदशा असते. या वेळीं विद्यार्थ्यांनीं ब्रह्मचर्य, आयुष्य, आरोग्य यांना पोषक होतील असे अन्नासंबंधाचे म्हणजे जेवण्याखाण्याचे कांहीं नियम पाळले पाहिजेत.

**गोविंद**—जेवणाखाण्याचे नियम पाळावयाचे म्हणजे नेहमी पथ्य करावयाचें की काय?

**गुरुजी**—नाहीं. दुखणेकऱ्याचें पथ्य करावयाचें नाहीं. पण शरीरबळ आणि बुद्धिबळ वाढेल अशा दृष्टीनेंच योग्य तें अन्न खाल्लें पाहिजे. बरें मुलांनों, तुम्ही दररोज सकाळीं काहीं खाता पिता काय?

**गोविंद**—मी काहीं खात नाहीं. एकदम १०॥ वाजतां जेवतों.

**गंगू**—मी माझ्या आत्याबरोबर दररोज सकाळीं चहा पितें.

**धोंडिबा**—आमच्या घरीं दररोज सकाळीं न्याहारी करतात. तेव्हा मीहि ताजी भाकरी नि कोरड्यास खातों.

**रामनाक**—मीहि ताजी शिळी असेल ती भाकरी चटणी बरोबर खातों.

**गुरुजी**—तुम्हापकीं एकानेंही दूध पितों असें सागितलें नाहीं. वास्तविक ज्याना ज्याना अनुकूल असेल त्यानीं त्यानीं सकाळीं दूध

प्यालें पाहिजे. दूध हें पौष्टिक आहे, बुद्धिवर्धक आहे नि रक्तवृद्धि करणारें आहे. तुम्हांपैकीं कांहीं मुलांच्या घरीं गाईम्हशी असतील, त्यांचें दूध फारच चांगलें मानवतें.

ग्यानबा—शेळीचें दूध प्यावें काय?

गुरुजी—सर्वांत उत्तम गाईचें दूध. त्या दुधापासून बुद्धींत आणि शरीरांत चलाखपणा येतो. म्हशीचें दूध हें जड असतें. म्हशीपेक्षां शेळीचें दूध चांगलें. शेळी नेहमी अनेक प्रकारच्या वनस्पति, कांटेरीं झुडपें खात असते. त्यामुळें तिचें दूध म्हणजे एक प्रकारचें रसायनच असतें. तें पहिलवान लोक पितात. तुम्ही गाय, म्हैस, शेळी यांपैकीं कोणाचेंही दूध प्या. तें मिळाल्यास धारोष्ण प्या. न मिळाल्यास तापवून प्या. पण काय पाहिजे तें करून दूध प्या.

गोविंदा—सकाळीं दूध न मिळालें किंवा गरीबीमुळें तें घेतां आलें नाहीं तर काय करावें?

गुरुजी—दूध सकाळीं न मिळाल्यास रात्रीं निजतांना घ्यावें, मधल्या सुट्टींत घ्यावें, जेवतांना घ्यावें, कोणीकडून केव्हातरी तुमच्या पोटांत दूध जावें म्हणजे झालें. आतां गरीबमुळें दुधाची सोय नसेल तर न्याहारी करावी. पुष्कळ हिंदूमध्यें ही न्याहारीची चांगली चाल आहे. ब्राह्मणांतही लहान मुलाना सकाळीं ताजा भात करून जेवूं घालतात. सकाळीं ताजा भात किंवा भाकरी, दशमी, जें मिळेल तें खावें. एखादे वेळीं ताजी भाकरी न मिळाल्यास शिळीसुद्धां चालेल. पण शिळ्या अन्नानें बुद्धि मंद होते आणि कोठ्याची पचनक्रिया बिघडते. सकाळच्या वेळीं जें खाणें तें फार थोडें खावें.

गंगू—सकाळीं उठून चहा प्यावा कीं नाहीं?

गुरुजी—अलीकडे चागल्या चागल्या डॉक्टराचीं मतें चहा विषयीं प्रतिकूल आहेत. चहा हें एक व्यसन आहे. या व्यसना-मुळें विद्यार्थ्यांचे कोठे बिघडतात. शरीरपोषक जीं द्रव्यें त्यावरही अनिष्ट परिणाम होतो. चहाचा उष्णता, तो कढत कढत पिणें, याचाही परिणाम या आपल्या देशातील लोकांवर वाईट होतो असें ते म्हणतात. तुम्ही अद्याप ल्हान आहात. चहा बरा कीं वाईट हें स्वत तुम्हाला कळावयाला अद्याप अवकाश आहे. पण या ल्हान वयांत चहा हें व्यसन आहे, हें मादक पेय आहे, हें ब्रह्म चर्यविघातक आहे, असेंच तुम्ही समजा तुमच्या घराघरीं चहा होत असेल. वडील माणसें, म्हातारीं कोतारीं माणसें चहा पीत असतील, सकाळीं तीं तुम्हांला ' घ्यारे थोडा चहा ' असें म्हणत असतील. तुम्हांलाही वडील माणसाच सागणें म्हणून किंवा स्वत ला तो गोड लागतो म्हणून घ्यावासा वाटत असेल, परंतु तुम्ही तो घेऊ नका. ल्हानपणीं चहा न घेण्यात तुम्ही मनोधैर्य दाखवा. चहा घेऊन जें तुम्हाला सुख होईल त्यापेक्षा चहा न घेण्यानें तुमचें अधिक कल्याण होईल, असें मी सागतों.

वया—दुधापेक्षा चहाला खर्च कमी येत नाहीं का ?

गुरुजी—चागला प्रश्न केलास. चहा, साखर, दूध, जळण याचा महिन्याचा खर्च जितका येतो, तितक्याच खर्चांत दुसरें काहीं चागलें खावयास मिळालें म्हणजे झालें कीं नाहीं ?

वया—हो, तसें झालेंतर काहीं हरकत नाहीं

गुरुजी—दररोज सकाळीं एक रामपात्रभर चहाकरिता दरमहा माणशीं कमींत कमी एक नि ज्यास्तींत ज्यास्ती दोन रुपये खर्च

येतो, असें धरा. एवढ्याच खर्चांत सकाळीं पिवळ्या मुगाचे चांगले खमंग लाडू खाता येतील. ताजी भाकरी, चपाती भात हीं तर सहज होतील. दररोज सकाळीं पांच बदाम नि थोडा वेदाणाही खातां येईल. दूध कदाचित् न मिळालें तरी अर्ध्या पावशेर दुधाचें चागलें रवीखालचें साजूक ताक पितां येईल. दुधापेक्षां ताकाचें महत्त्व अलीकडे डॉक्टर लोक जास्त जास्त सागू लागले आहेत. म्हणून चहाच्या ऐवजीं तेवढ्याच खर्चांत वरीलपैकीं कोणतीही गोष्ट करा.

पुरुषोत्तम—चिवडा, भजी, शेव, चुरमुरे यांतील कांहीं सकाळीं खावें काय?

गुरुजी—छे छे, बिल्कुल खाऊं नये. चिवडा, शेव, भजीं, थालीपीठ हे तामस पदार्थ प्रकृतीला अपाय करितात. तसेंच मनाला हीं अपाय करतात. म्हणून ते सकाळीं कधींच खाऊं नयेत. खावयाचे झाल्यास तिसरे प्रहरीं, मधल्या सुटींत थोडे थोडे खावे. चिवडा, शेव, लाडू असले पदार्थ दुकानातून घेऊन खाण्याची संवय पुष्कळ विद्यार्थ्यांना अलीकडे लागूं लागली आहे. शहरात तर चहाकाफीचें दुकान प्रत्येक घराआड आहे. परंतु विद्यार्थ्यांनीं आपल्या विद्यार्थिदशेंत या मोहापासून दूर रहावें. या वाईट सवयीमुळें जीभ चवचाल होते. जिभेचा, अन्नाचा नि ब्रह्मचर्याचा संबंध आहे. "अन्न तारी नि अन्न मारी" ही म्हण प्रसिद्धच आहे. म्हणून जीभ सदैव आवरली पाहिजे. जीभ आवरता आली कीं मनुष्य मोठा होतो. जीभ सैल सुटली कीं आरोग्याचा ऱ्हास होतो. मसाल्याचे, अति तिखट, खमंग पदार्थ खाल्ल्यानें जीभ चवचाल होते. तिचा

चवचालपणा चाढ दिला कीं विद्यार्थ्यांच्या आरोग्याचें वाटोळें होतें. विद्यार्थ्यांचें लक्ष असल्या तामस पदार्थांच्या खाण्याकडे जाऊं लागलें म्हणजे पैसे नसल्यास चोरी करावीशी वाटते. चोरी करून पैसा न मिळाल्यास उसनें काढणें, बापाच्या नांवावर लिहून ठेवण्यास सांगणें असले धंदे सुरू होतात. बाजारांत मिळणारे पदार्थ जर घरांत केले तर खर्च कमी येऊन चांगला, स्वच्छ आणि रुचकर पदार्थ खाण्यास मिळतो. चहाकाफीच्या दुकानात आधीं माणसें येऊन येऊन इतकी घाण झालेली असते कीं तेथें गेल्यावर खंतच येते. पदार्थावर माशाच्या झुंडीच्या झुंडी हल्ले करीत असतात. पदार्थ खाण्याचीं नि पिण्याचीं भांडीं इतक्या लोकाच्या तोंडाला लागलेलीं असतात कीं त्यांत अमुक एका रोगाचा मनुष्य सुटला असेल अगर चुकला असेल असें कधींही म्हणतां येणार नाहीं. भांडीं विसळण्याचें एक महाकुंड परटाच्या सताऱ्याप्रमाणें असतें त्यांत तीं सर्व भांडीं एकदा खळखळून बाहेर काढलीं जातात. बरें पदार्थ तरी स्वाभाविक रुचीचे असतात म्हणावें तर तसेंही नसतें. गोडपणा नि खमंगपणा आणण्याकरिता साखर नि मसाला याचा रगडून उपयोग केला जात असल्यामुळें तसले पदार्थ आरोग्यशास्त्रदृष्ट्याही हानिकारक असतात. तात्पर्य दुप्पट पैसे घालविणारे, चोरीचें व्यसन लावणारे, आरोग्य बिघडविणारे, जीभ चवचाल करणारे आणि शौचधर्म नाहींसे करणारे दुकानातील फराळाचे पदार्थ तुम्ही कधींही खाऊं नका.

कृष्णा—जेवताना कोणते पदार्थ किती खावेत ?

गुरुजी—जेवताना अति तिखट, अति गोड, अति खमंग असले पदार्थ खाऊं नयेत. विद्यार्थ्याचें अन्न हें सामान्यतः फार सात्त्विकही

नसावें, आणि तामसही नसावें. घरामध्यें एकच स्वयंपाक सगळ्यांकरितां केलेला असतो. परंतु ठिकठिकाणीं जीं हल्लीं विद्यार्थीवसतिगृहें निघत आहेत, तेथें तरी हा आहाराचा नियम चांगला अमलांत आणावा. मूग, गहूं, जोंधळा, चांगलें तूप, पालेभाज्या, बटाटा, काकडी, मुळे, लिंबू असे त्या त्या ऋतूंत आणि त्या त्या काळीं मिळणारे सर्व पदार्थ विद्यार्थ्यांनी खावेत.

पुरुषोत्तम—चटण्या, कोशिंबिरी फारशा कां खाऊं नयेत ?

गुरुजी—अरे, जेवणांत मुख्य काय आणि गौण काय हें लक्षांत ठेविलें पाहिजे. भात, भाकरी, चपाती हें मुख्य अन्न. तोंडीं लावणीं हीं मुख्य नव्हत, तीं अन्नाला पोषक मात्र असतात. शिवाय ज्यांना चांगली रखरखीत भूक लागलेली असते त्यांना तोंडीं लावण्याची फारशी गरजच लागत नाहीं. नसलेली भूक उत्पन्न करण्याकरितां हीं तोंडीलावणीं नि मसाले पाहिजे असतात. मनुष्य जें अन्न खातो त्याचे तीन प्रकार होतात. अन्नांतील सूक्ष्म रस बुद्धि आपल्याकडे घेते. जशा प्रकारचें अन्न पोटांत जाईल, तसें मन बनतें. मनाची पवित्रता ठेवण्याकरितां चांगल्या अन्नाची जरुरी असते. मन नेहमीं प्रसन्न ठेवणें हें विद्यार्थिदशेंतील कर्तव्य आहे.

दया—जेवतांना मन कसें प्रसन्न ठेवावें ?

गुरुजी—जेवतांना मन प्रसन्न असलें तर खाल्लेल्या अन्नाचे सुपरिणाम होतात. जेवताना अन्नाला नांवें ठेवणें, भांडणें, रागावणें, कुत्सित बोलणें, असले प्रकार करूं नयेत, म्हणून ' गोविंद गोविंद ' असें म्हणण्यास नि श्लोक म्हणण्यास सांगितलें आहे.

कृष्णा—जेवतांना कोणते श्लोक म्हणावेत ?

गुरुजी—जर्नी भोजर्नी नाम याचें वदावें । अर्ता आदरें गद्यघोषें म्हणावें ॥ हरीचिंतनीं अन्न सेवीत जावें । तरी श्रीहरी पाविजे तो स्वभावें ॥ १ ॥ वदनिं कवळ घेता नाम घ्या श्रीहरीचें । सहज हवन होतें नाम घेता फुकाचें ॥ जिवन करि जिवित्वा अन्न हें पूर्ण ब्रह्म । उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म ॥ २ ॥ ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणाहुतं । ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥३॥

हे समर्थ, वामन पंडित यांचे आणि गीताप्रयातील श्लोक दररोज म्हणत जा. अर्थाकडे लक्ष देऊन म्हणा. अन्नाची निंदा न करता ( अन्न न निंद्यात् तद्व्रत ) शांतपणानें भोजन करावें.

नया—किती जेवावें नि किती पाणी प्यावें ?

गुरुजी—पोटाला तडस लागेल इतकें जेवू नये आणि उपाशी ही उठू नये. जेवणानंतर दुपारी राहील इतकें नेहमी जेवावें. मधून मधून थोडें थोडें पाणी प्यावें. घटाघटा प्रमाणाबाहेर पाणी प्याल्यास तडस लागते आणि अपचन होतें. अन्न चांगलें चावून चावून खावें. ईश्वरानें आपल्याला दांत अन्न चांगलें चावण्याकरिता दिले आहेत. जो अन्न चांगलें चावून चावून खातो, जेवणामध्यें नेमस्तपणा ठेवितो, त्याला आरोग्य, आयुष्य, बळ आणि सुख हीं प्राप्त होतात.

तुळसा—' अति खाणें आणि मसणात जाणें ' या म्हणीचा अर्थ हाच काय ?

गुरुजी—होय, अति जेवण केलें म्हणजे लवकर लवकर प्रकृति बिघडू लागते प्रकृति तशी बिघडली की लवकरच मसणात जाण्याचा म्हणजे मरून स्मशानात जाण्याचा प्रसंग येतो. आयुष्य वाढावें,

रोग होऊं नयेत, लोकांनीं खादाड असें म्हणूं नये, अशी इच्छा असेल तर मनुष्यानें मिताहारी असावें. जेवणासंबंधानें मुलांनो, तुम्ही ही एक गोष्ट लक्षात ठेवा कीं तोंड आहे, खायला मिळतें आहे म्हणून जेवायचें नाहीं तर आपल्याला कांहीं कार्य करावयाचें आहे, त्या कार्याकरितां जगावयाचें आहे, आणि जगण्याकरितां जेवावयाचें आहे. पुष्कळांची समजूत जेवण्याकरितां जगावयाचें अशी असते, म्हणून त्याच्याकडून आहाराच्या बाबतींत फार अधर्म घडतो. असो. सावकाश समाधानानें चावून चावून मिताहार करावा.

**रामचंद्र**—जेवणाबरोबर आणखी कांहीं गोष्टी सांगण्यासारख्या असल्या तर सांगा.

**गुरुजी**—जेवतांना स्वच्छ धुतलेलें धोतर नेसावें. सर्व हिंदु विद्यार्थी जेवताना सोवळें नेसतील तर चांगलें होईल. सोवळें म्हणजे शुचिर्भूतपणा नि पवित्रपणा आहे. कित्येक दिवस न धुतलेले मुकटे किंवा धाबळ्या नेसल्या म्हणजे सोंवळें होतें, असें नव्हे. तसेंच जेवणाची जागा स्वच्छ झाडलेली असावी. पाट, ताट, वाटी हीं स्वच्छ असावींत. उष्ट्या भांड्यानें पाणी पिऊं नये, उष्ट्या ताटांत जेवूं नये, ओंठ न लावतां वरून पाणी पिण्याची संवय करावी. न धुतलेलें कधींही कोणाचें धोतर नेसूं नये असे हे जेवणाच्या वेळचे स्वच्छतेचे नियम आहेत. स्वच्छ अन्न, स्वच्छ जागा, पवित्र मन या तिहींचा संयोग झाला म्हणजे खाल्लेल्या अन्नाचा बुद्धीचें आणि मनाचें पोषण करण्याकडे फार चांगला उपयोग होतो. जिभेचा चवचालपणा नि खाण्याकडे लक्ष, हे दुर्गुण विद्यार्थ्यांना जडले कीं विद्येचें खोबरें झालें असे जुने लोक म्हणतात.

प्रेमचंद—त्याला काय आधार आहे?

गुरुजी—अरे, त्याला काहीं मोठा आधार नको. विद्यार्थ्याचें लक्ष विद्याभ्यासाकडे असावें, इतर गोष्टीकडे असू नये

*सुखार्थी वा त्यजेत् विद्यां । विद्यार्थी वा त्यजेत् सुखम् ॥*

सुखार्थिनः कुतो विद्या । कुतो विद्यार्थिनः सुखम् ॥

हेंच या श्लोकांतील मुख्य तत्त्व आहे. पूर्वी एकदा एका गुरूच्या घरीं एक शिष्य शास्त्राभ्यास करण्याकरिता राहात होता. गुरुपत्नीची त्या मुलावर फार माया होती. ती त्याला दररोज सकाळीं न्याहारी करिता दही दशमी देत असे, पण त्या दह्यात, त्या मुलाची बुद्धि वाढावी म्हणून ती मेथ्या टाकीत असे. (मेथ्या बुद्धिवर्धक आहेत.) दह्यात भिजलेल्या त्या मेथ्या, दशमी नि दही खाण्याचा त्या विद्यार्थ्याचा परिपाठ कित्येक वर्षें चालला असता एके दिवशीं तो विद्यार्थी म्हणाला "मातुःश्री आज दशमी कडू लागते." त्याबरोबर ती गुरुपत्नी म्हणाली तुझी विद्या संपली म्हणून तुला दशमी कडू लागूं लागली. तुझें आता विद्येकडे लक्ष नाहीं. तें खाण्याकडे लागलें आहे. मी इतके दिवस तुझी बुद्धि वाढावी म्हणून असाच मेथ्या दह्यात घालून दररोज देत होते. मुलांनो, या गोष्टीचें तात्पर्य नीट लक्षांत ठेवा आणि त्याप्रमाणें वागा.



## अकराव्या पाठाची पुरवणी.

अन्नमशितं त्रेधा विधीयते। तस्य यः स्थविष्ठोधातुस्तत्पुरीषं भवति यो मध्यमस्तन्मांसं योऽणिष्ठस्तन्मनः ( छांदोग्य अध्याय ६ )

### श्रीमत् भगवद्गीता अ. १७

आयुः सत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्विक प्रियाः ॥ ८॥
कट्वम्ललवणात्युष्ण तीक्ष्ण रुक्ष विदाहिनः।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥
यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत्।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम्॥ १० ॥

### मनु अ. २

वर्जयेन्मधुमांसं च गंधं माल्यं रसान् स्त्रियः।
शुक्तानि यानि सर्वाणि प्राणिनां चैव हिंसनम् ॥ १७७ ॥
पूजयेदशनं नित्यमद्याचैतदकुत्सयन्।
दृष्ट्वाहृष्येत्प्रसीदेच्च प्रतीनन्देच्च सर्वशः ॥ ५४ ॥
पूजितं ह्यशनं नित्यं बल्यमूर्जं च यच्छति
अपूजितं तु तद्भुक्तमुभयं नाशयेदिदम् ॥ ५५ ॥
अनारोग्यमनायुष्यमस्वर्ग्यं चाति भोजनम्।
अपुण्यं लोक विद्विष्टं तस्मात्तत्परिवर्जयेत् ॥ ५७ ॥

### महाभारत उद्योगपर्व अ. ३७

गुणाश्च षण्मित भुक्तं भजंते आरोग्यमायुश्च बल सुखंच ॥ ३४ ॥

---

# पाठ बारावा.

## अभ्यास.

गुरुजी—मुलांनो, विद्यार्थिदशेंत विद्यासंपादन करणें आणि शरीर कमावणें हें तुमचें पांचवें कर्तव्य आहे. मनुष्याला मनुष्यपण हें बुद्धिबल आणि शरीरबल यांमुळेंच येतें बुद्धिबल नि शरीरबल हे पदार्थ भाजीपाल्याप्रमाणें बाजारात मिळतात कायरे रामनाक?

रामनाक—नाहीं नाहीं. विद्या नि शरीरबल हे पदार्थ बाजारात कसें विकत मिळतील?

गुरुजी—मग विद्या नि शरीरबल मिळविण्याकरिता तुम्हीं काय केलें पाहिजे?

पुरुषोत्तम—विद्या मिळविण्याकरिता अभ्यास केला पाहिजे आणि शरीर कमविण्याकरिता सर्व तऱ्हेचा व्यायाम घेतला पाहिजे.

गोविंद—नुसती विद्या मिळविली म्हणजे पुरे झालें. शरीर कमावून प्रत्येकाला पहिलवान थोडेंच व्हावयाचें असतें? ज्याला पहिलवान व्हावयाचें असेल, कुस्त्या मारावयाच्या असतील, त्यानें शरीर कमवावें.

गुरुजी—अरे गोविंद तूं चुकतोस. शरीर हें सर्व गोष्टींचें नि व्यवहाराचें मूळ आहे. विद्यासपादन करण्याकरिता जी चिकाटी धरावी लागते, जो नेटानें अभ्यास करावा लागतो, त्याला शरीर-बळाची आवश्यकता नाहीं काय? शिवाय धर्माचरण करण्याला म्हणजे ईश्वरानें नेमून दिलेलीं कर्तव्यें करण्याला अंगात बळ नको

काय? समज तुलाच उद्या दहा मैल चालत जावयाचें आहे, पण तुझ्या अंगात जर शक्ति नसली तर तू काय करणार?

प्रेमचंद—विद्येला, धर्माचरण करण्याला किंवा जगातला कोणताही व्यवहार करण्याला शरीरबलाची अत्यंत आवश्यकता आहे यांत शंका नाहीं

गुरुजी—अरे, हिंदुस्थानात आजकालचा व्यवहार शरीराच्या दुर्बळपणामुळें मोठा वाईट झाला आहे. देशातले पुढारी नि कार्यकर्ते हे सर्व देशातल्या मुलाना धष्टपुष्ट व्हा, सुदृढ व्हा, निरोगी व्हा असें सांगत आहेत. कारण हिंदुस्थान देश स्वराज्य मिळवू पाहात आहे. स्वराज्य मिळविणें म्हणजे काहीं लहानसहान गोष्ट नव्हे. हा 'धवाधकीचा मामला। कैसा घडेल अशक्ताला' असें श्रीसमर्थ म्हणतात. तात्पर्य शरीरबल हें सर्व दृष्टींनीं आवश्यक आहे.

धोंडिबा—नुसत्या शरीरबलानें सर्व काहीं मिळविता येईल काय?

गुरुजी—नाहीं बुद्धिबलानें जें मिळवावयाचें त्याला शरीरबलाची आवश्यकता आहे. गाडीला जशीं दोन चाकें, पक्ष्याला जसे दोन पख तशींच मनुष्याला हीं दोन्हीं बलें पाहिजेत नुसतें बुद्धिबल किंवा नुसतें शरीरबल हीं निरुपयोगी होत. श्रीसमर्थ म्हणतात

'शक्तीनें मिळती राज्यें। युक्तीनें यत्न होतसे॥
शक्ति युक्ति जये ठायीं। तेथें श्रीमंत धावती॥

मनुष्याला शक्ति पाहिजे नि युक्ति पाहिजे. विद्यार्थिदशेंत तुम्हाला प्रामुख्यानें या दोन बलाचा अभ्यास करावयाचा आहे. हीं दोन्हीं बलें तुम्हाला श्रमाविना मिळणार नाहींत त्याच्याकरिता तुम्हांला एकसारखा प्रयत्न केला पाहिजे

मोरू—एखादा मुलगा अशक्त असला तरी व्यायामानें सशक्त होईल काय?

गुरुजी—अरे प्रयत्नानें इकडचें जग तिकडे करता येतें व कधीं एखादी सर्कस पाहिली आहेस कीं नाहीं?

मोरू—होय पाहिली आहे. वाघ, सिंह, हत्ती यांचीं कामें मीं पाहिलीं आहेत.

गुरुजी—सिंह, वाघ हीं क्रूर जनावरें सर्कशीमध्यें त्याना शिकवलेलें असतें म्हणूनच कामें करतात ना? अरे, जनावरें माणसासारखीं वागून दाखवितात मग माणसानें प्रयत्न केला तर काय वरें होणार नाहीं? अशक्त मनुष्य जर व्यायाम करील तर तो सशक्त होईल. बुद्धीनें मद असलेला मुलगा जर चिकाटीनें अभ्यास करील तर तोहि हुशार मुलाला लाजवील तुम्हाला ती कासव आणि ससा याची गोष्ट ठाऊक आहे कीं नाहीं.

रामचंद्र—होय. त्या दोघाचा पैज लागली होता पण शेवटीं त्या कासवानेंच पैज जिंकली.

गुरुजी—अभ्यासाच्या योगानें अशक्त मुलाला आणि कमी बुद्धीच्या मुलाला कासवाप्रमाणें पज मारिता यईल "असाध्य हे साध्य करिता सायास। कारण अभ्यास तुका म्हणे" तुकारामबावा म्हणतात. अगदीं न साधणारी गाष्ट सुद्धा अभ्यासानें साधतें असें भगवान् श्रीकृष्णानीं सागितलें आहे. (अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येणच गृह्यते) म्हणून तुम्ही शरीरबळ नि बुद्धिबळ याचा अभ्यास करा

शान्तशील—अभ्यास म्हणजे काय?

गुरुजी—अभ्यास म्हणजे कोणतीही गोष्ट पुन पुन करणें.

कोणतीही गोष्ट पहिल्यानें आपणाला येत नाहीं, ती पुन्हां पुन्हां करणें याचें नांव अभ्यास. समज एकादी कविता मी तुला सांगितली तीं तुझ्या लक्ष्यांत राहिली नाहीं म्हणजे तूं काय करशील?

शान्तशील—मी ती कविता सातआठ वेळां मोठ्यानें म्हणेन.

गुरुजी—झालें तर मग त्याचें नांव अभ्यास. मुलांनो, तुम्ही शरीर बळाचा कोणकोणता अभ्यास करतां?

रामचंद्र—मी दररोज सकाळीं स्नान केल्यानंतर सूर्याला नमस्कार घालतों.

रामनाक–मी दररोज संध्याकाळीं शाळा सुटल्यावर सटवाईच्या देवळापर्यंत पळत जातों.

चंपावती—मी झोंपाळ्यावर बसून झोंके घेतें.

गुरुजी—तुमच्यासारख्या सर्व हिंदु विद्यार्थ्यांनीं नित्य नेमानें सकाळीं सूर्याला नमस्कार घातले पाहिजेत. साष्टांग नमस्काराचा व्यायाम हा फार चांगला आहे. यांत स्वार्थ आणि परमार्थही सांधतो. 'आरोग्यं भास्करादिच्छेत्' सूर्यापासून आरोग्याची इच्छा करावी. सूर्य हा स्थावर जंगम जगाचा आत्मा आहे. (सूर्य आत्मा जगतस्तस्थुपश्च) त्याच्या किरणांमध्यें रोग नाहींतसे करण्याचें सामर्थ्य आहे. सूर्याला नमस्कार फार प्रिय आहेत. म्हणून नमस्काराचा व्यायाम करा. नमस्काराशिवाय सकाळीं दुसराहि व्यायाम करण्यासारखा आहे.

कृष्णा—तो कोणता?

गुरुजी—जोर बैठका काढाव्या. अशक्त विद्यार्थ्यांनीं या वेळीं उघड्या हवेंत झरझर चालत जाण्याचा क्रम ठेवावा. सशक्त विद्या-

र्थ्यांनीं मैल दोन मैल रपेट करावी. विद्यार्थ्यांनीं कांहीं कांहीं आसनें-ही करावीं. मात्र आसनें कशीं करावीं नि कोणतीं करावीं हें समजून घ्यावें. शीर्षासन, बद्धपद्मासन, पश्चिमोत्तान, मयूरासन, असलीं आसनें केल्यास शरिरांतील सर्व रोग जळून जातील.

**कृष्णा**—सकाळीं उठून स्नान करून घोड्यावर बसून फिरावयास जावें काय?

**गुरुजी**—वेळाशक्य जावें. दहा पांच मैल घोड्यावरून दौड करणें सर्व दृष्टींनीं आरोग्यदायक आहे. अरे कृष्णा, तुझ्यासारख्या एकाद्याला घोडा मिळेल पण गरिबांना ती गोष्ट शक्य नाहीं. असो. घोड्यावर बसणें, फिरावयास जाणें, मैल दोन मैल पळणें, जोर बैठका काढणें, आसनें करणें, नमस्कार घालणें यापैकीं कोणता तरी व्यायाम नेमानें घाम येईपर्यंत करा. शरीरबलाच्या अभ्यासाचीं हीं सर्व साधनें आहेत त्याचा उपयोग तुम्ही चांगला करून घ्या. त्यातल्यात्यात नमस्कार आणि आसनें हे धर्मदृष्ट्या तसेंच आरोग्यदृष्ट्या चांगले व्यायाम आहेत असें मी तुम्हाला वरचेवर सांगतों.

**मोरेश्वर**—व्यायामाचा आणखी कसकसा अभ्यास करावा?

**गुरुजी**—'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' शरीर हें धर्माचें पहिले साधन आहे हें लक्षात ठेवून त्या शरिराच्या ठिकाणीं दणकटपणा, काटकपणा, कणखरपणा, ज्या ज्या कारणानें यईल तें तें सर्व केलें पाहिजे. शरीर चांगलें लोखंडासारखें बनविलें पाहिजे, लोखंडासारखें भक्कम शरीर आणि मोठी विशाल बुद्धि याच्याच जोरावर श्रीशिव छत्रपतींनीं स्वराज्यस्थापनेकरिता कंबर बांधली दिवसानुदिवस नाजुकपणा, अजागळपणा, अशक्तपणा, याचेंच विद्यार्थ्यांना भूषण वाटू लागलें a ". तें फार वाईट आहे

रामनाक—काटकपणा नि कणखरपणा कशानें येतो.

गुरुजी—नित्य शारिरीक कामाचे बरे वाईट प्रसंग व्यवहारांत येतात. त्या त्या प्रसगीं अंगचोरपणा न करिता अंग मोडून काम करावें म्हणजे झालें. उन्हातान्हांत दहापंधरा मैल चालणें, शेतातील कामें करणें, कपडे धुणें, दहावीस माणसाचा स्वयपाक करणें, बाजारहाट करणे, घर सारविणें, लाकडें फोडणें, पाणी भरणें, माती वाहणें, खणणें, अशीं अनेक प्रकारचीं कामे केल्यानें शरीर काटक होतें. लग्नकार्याचा प्रसंग, घरांतील अडीअडचणीचा प्रसग, तुमच्या शाळेचा वार्षिकोत्सव, गावातील सार्वजनिक उत्सव, यात्रा जत्रा अशा प्रसंगीं निरनिराळ्या प्रकारचीं कामें उन्हातान्हात, वेळींअवेळीं, रात्रीबेरात्रीं, उपाशीतापाशी, अशा स्थितींत केलीं म्हणजे शरिराला सगळ्या प्रकारची सवय होते आणि तें कोणत्याही प्रसंगीं चांगला टिकाव धरतें. मुलींनींही वरील सर्व प्रसगीं आपल्याला येतील अशीं सर्व कामें करावींत. तसेंच वाढणे, स्वयपाक करणें, केरपोतेरें करणें, दळणें, काडणें, लुगडीं धुणें, कुटणें, अंथरुणें घालणें, चाळणें, पाखडणें, शेण लावणें, भांडीं घासणें, वाटणें, डाळतांदूळ निवडणें, असलीं हरघडी पडणारीं घरांतील सर्व कामें मुलींनीं केलीं पाहिजेत मुलींनीं अशा प्रकारचीं कामें केलीं म्हणजे त्यांचीं शरीरें काटक होतील आणि त्याही शभर वर्षें जगतील. दीर्घायुषी व्हावें असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं या असल्या कामांना टाळा देऊ नये.

गणेश—गुरुजी, फक्त सकाळीं व्यायाम करण्याबद्दल सागितलें. सध्याकाळीं आम्हीं काय काय करावें तें काहींच सागितलें नाहीं.

**गुरुजी**—बरोबर आहे. विद्यार्थिधर्माप्रमाणें पहाटे उठून प्रातःस्मरण शौचमुखमार्जन आणि स्नान उरकून कोणता व्यायाम करावा म्हणजे शरीरबळाचा अभ्यास करावा एवढाच विषय मी सांगितला. आता तुझ्या प्रश्नाचें उत्तर देतों ऐक. पधरा वर्षांपर्यंतच्या विद्यार्थ्यांनीं संध्याकाळीं शाळा सुटल्याबरोबर अनेक प्रकारचे खेळ खेळावेत. खेळासारखा उत्तम व्यायाम नाहीं. आट्यापाट्या, खोखो, हुतुतु, सुरकाठी, सुरपारवी, चेंडूलगोरी, असले खेळ विद्यार्थ्यांनीं खूप खेळावें. क्रिकेट हा विदेशी नि पैशाचा खेळ आहे. फुटबॉलही विदेशीच खेळ आहे. परतु त्याला पैसे थोडे पुरतात म्हणून तो खेळ खेळावा. खेळामुळें व्यायाम होतोच. पण हासणें, खिदळणें, आरडाओरडा करणें, यामुळें मेंदूलाही एक प्रकारची प्रसन्नता येते.

**वया**—मुलींनीं कोणते खेळ खेळावे नि कोणता व्यायाम करावा?

**गुरुजी**—बारापासून पधरा वर्षांपर्यंतच्या मुलींनींसुद्धा सकाळीं १०८ प्रदक्षिणा तुळशीला किंवा देवाला घालाव्या. प्रदक्षिणा घालण्यात स्वार्थ व परमार्थ साधतो. मुलाप्रमाणें मुलींनींही दहावीस प्रकारचीं आसनें करण्यास काहीं हरकत नाहीं. मुलींनीं लहानपणीं पोहायलासुद्धा शिकलें पाहिजे.

**भागीरथी**—बायकाना पोहणें कशाला पाहिजे?

**गुरुजी**—बायकानासुद्धा पोहायला आलें पाहिजे. समज तूच उद्या मुलगा बरोबर घेऊन नदीवर धुवावयास गेलीस तुझें लक्ष्य धुण्याकडे गुतलें असताना तुझा मुलगा पाण्यात जाऊन बुडू लागला, अशा वेळीं तुला पोहता येत असेल तर तू चटकन् आपल्या मुलाला काढशील किंवा अशाच प्रसगीं दुसऱ्याचेंही जीव वाचविशील.

काशी—प्रदक्षिणा, नमस्कार, आसनें, पोहणें हा व्यायाम आम्ही सकाळीं करावा. पण संध्याकाळीं काय काय करावें बरें?

गुरुजी—सायंकाळीं शाळा सुटून येतांच तुम्ही मुलांप्रमाणें अनेक प्रकारचे निरनिराळे खेळ खेळावे. शहरामध्यें मुलांप्रमाणें मुलीही सर्व खेळ कोठें कोठें खेळतात. तशी खेळण्याचीसोयही कांहीं ठिकाणीं आहे. परंतु खेड्यांपाड्यामध्यें अद्याप तशी चाल नाहीं नि सोय नाहीं. तुम्हीही हुतुतुसारखा तुमचा उमेराचक्री भोरा हा खेळ खेळा. दोरीवरच्या उड्या मारा, फुगडी, झिम्मा, निसरफुगडी, डोंगरडाव, पिंगा, कोंबडा, सुसरीचें तळें, हे सगळे खेळ खेळत जा. हे सर्व खेळ खेळल्यानें पुष्कळ व्यायाम होईल. या खेळापासून तुम्हांला एक प्रकारचें नीतिशिक्षणही मिळेल.

अमृतलाल—खेळापासून नीतिशिक्षण कसें मिळतें?

गुरुजी—खेळात म्होरक्याच्या आज्ञेंत वागावें लागतें, म्हणून आज्ञापालन हा गुण येतो. सावधपणा नि धडाडी हे गुण आट्यापाट्या नि खोखो या खेळानीं वाढतात. खेळांत हार खावी लागली नि चिडविलें कीं, स्वाभिमान वाढतो.

गोपाळ—स्वाभिमान कसा वाढतो?

गुरुजी—अरे, खेळात काय, घरात काय, बाहेर काय प्रत्येकाची इच्छा लोकांनीं आपणांस बरें म्हणावें ही असते. मुलें चिडवूं लागलीं म्हणजे एक प्रकारची फजिती झाली असें मनाला वाटतें नि तसें होऊं नये म्हणून तुम्ही काळजीनें खेळता याचेंच नाव स्वाभिमानाची जाणीव. खेळाप्रमाणें पोहोण्याचाही सुंदर व्यायाम आहे. नदीकाठचे विद्यार्थी स्नानाच्या वेळीं तो करूं शकतात, आणि

त्यांनीं तो दररोज करावा. नदीची सोय जेथें नसेल त्यांनीं सुट्टीच्या *दिवशीं निदान आठवड्यांतून एकदां तरी अवश्य पोहावें.* पोहण्यामुळें धाडस, साहस, धैर्य, हे सद्गुण येतात. तुमचें शरीरबल वाढावें, तुमच्या हातून मोठमोठीं कार्यें व्हावीं असें तुम्हां वाटतें काय?

मुलें—होय होय!

गुरुजी—तर मग आतांपर्यंत सांगितलेल्या सर्व गोष्टी लक्षांत ठेऊन शरीरबल मिळविण्याचा अभ्यास करा. दरसाल आपण इंग्रजी किती शिकलों, उदाहरणें किती सोडविलीं, इतिहास किती वाचला हे जसें तुम्ही पाहतां तसेंच उंची किती वाढली, वजन किती वाढलें, छाती किती रुंदावली हेंही पाहात चला. आतां शरीरबलाप्रमाणें विद्याबल संपादन करण्याकरितां कसकसा अभ्यास करावा. हें पाहूं?

बया—आम्ही हल्लीं दररोज जसा अभ्यास करितों तसाच ना? कीं कांहीं निराळा प्रकार आहे?

गुरुजी—तुम्ही दररोज कांहीं तरी अभ्यास करतां. पण तो पद्धतशीर होत नाहीं. दररोज सकाळीं सूर्योदयापूर्वीं उठून चूळ भरून प्रात:स्मरण केल्यावर अभ्यासाला बसावें. या वेळचा अर्धापाऊण तासाचा अभ्यास हा इतर वेळच्या तासादीडतासाची बरोबरी करतो. श्रीसमर्थ सांगतात, 'प्रात:काळीं उठावें। कांहीं पाठांतर करावें। यथानुशक्ति आठवावें। सर्वोत्तमासी॥ मागील उजळणी पुढें पाठ। नेमाचि धरावा निकट। वाष्कळपणाची वटवट। करूंच नये॥' पहांटेच्या वेळीं चांगल्या कविता, चांगले वेंचे, उत्कृष्ट उतारे तोंडपाठ करून टाकावे. समर्थांच्या म्हणण्याप्रमाणें 'अपार असावें

पाठांतर । सान्निधाचि असावा विचार' असें असलें कीं मनुष्याची स्मरणशक्ति नि विचारशक्ति वाढते. लहानपणींच पुष्कळ पाठहि होतें, तसें पुढें होत नाहीं. गीता, मनाचे श्लोक, केकावली यांतला कांहीं भाग सकाळीं पाठ केला म्हणजे मनाला आनंद वाटतो, वाणीला शुद्धता येते, स्मरणशक्ति जागृत राहते, आणि या पाठांतरांतील विचार वरचेवर सन्मित्राप्रमाणें हरघडी सल्ला देत असतात.

धोंडिबा—शाळेंतील अभ्यास पहाटे करूं नये काय?

गुरुजी—करावा असें. पण त्यांतीलही पाठ करण्याचा विषय पहाटे हातीं घ्यावा. शौचमुखमार्जन, स्नान, धोतरें धुणें, संध्या, नमस्कार नि व्यायाम हीं उरकल्यावर थोड्या वेळानें न्याहारी करावी, आणि अभ्यासास बसावें. विद्यार्थ्यांनीं सकाळीं ७ ते १० पर्यंत व्यवस्थित अभ्यास केला तर अभ्यासाचा ढीग पडेल. सकाळीं जो घरीं अभ्यास करावयाचा तो फार काळजीनें करावा, पण तो चांगला होण्याकरितां तुम्हाला दुसरी एक गोष्ट केली पाहिजे.

रामचंद्र—ती कोणती?

गुरुजी—ती गोष्ट म्हटली म्हणजे तुम्ही सर्वांनीं वर्गांत जेव्हां अभ्यास चालतो तेव्हां अभ्यासाकडे चांगलें लक्ष दिलें पाहिजे. एकीकडे मन नि एकीकडे कान अशी तुमची वर्गांत स्थिति असते, म्हणून घरीं अभ्यासास बसल्यावरही दुश्चितपणामुळें तुमच्या हातून अभ्यास होत नाहीं. आईबापांना तुमच्यासारख्या मुलांसाठीं घरीं शिकवावयास मास्तर पहावे लागतात. अशानें त्या बिचाऱ्यांचे दुप्पट पैसे खर्च होतात. दुप्पट श्रम, दुप्पट वेळ नि पैसा हीं वाचावीं असें

जर तुम्हांस वाटत असेल तर एकाग्र चित्तानें वर्गांत चाललेल्या विषयाकडे लक्ष द्या. म्हणजे तुमचा घरचाही अभ्यास चांगला होईल.

कृष्णा—वर्गांत कसें वागावें?

गुरुजी—वर्गांत अभ्यासाकडे नीट लक्ष ठेवावें. जें समजलें नसेल तें गुरुजींना पुन्हां विचारावें. समजलें नसतांना समजलें असें दाखवूं नये. प्रश्न विचारण्यांत कमीपणा मानूं नये. वर्गांत उगीच घुम्यासारखें किंवा दगडासारखें बसूं नये. गुरुजी सांगत असतांना एकमेकांशीं गप्पागोष्टी करूं नयेत. म्हणजे ते सांगतात त्याकडे लक्ष ठेविल्यानें विषय चांगला कळतो. वर्गांत विषय समजून घेतांना वह्यां वर जरूर तीं टांचणें टिपणें करावीं, अवश्य तेथें पुस्तकावरही खुणा करून घ्याव्या. अशा प्रकारें वर्गांत दक्षता घेतली नि सावधानता ठेवली म्हणजे घरीं आल्यावर एकदां त्या विषयाचें चिंतन करण्याचें आणि लिहिण्यासवरण्याचें जेवढें काम असेल तेवढेंच राहतें.

मोरेश्वर—सकाळीं कोणकोणते अभ्यास कसकसे करावे?

गुरुजी—कांहीं अडाणी मुलें सकाळीं उठून अंकगणिताचीं उदाहरणेंच घोकीत बसतात. कोणी भूगोलाच्या व्याख्याच न समजतां पाठ करीत बसतात. कांहीं मुलांची समजूत तर अभ्यास करणें म्हणजे पाठ करणें अशी झालेली असते. या सगळ्या चुकीच्या समजुती आहेत. मी तुम्हांला विषयवार अभ्यास कसकसा करावा हें थोडक्यांत सांगतों. भाषाविषयाचा अभ्यास करतांना नवीन नवीन आलेले शब्द, म्हणी, वाक्प्रचार, प्रयोग आणि वाक्यरचना यांकडे अधिक लक्ष द्यावें. कांहींहीं लिहितांना शुद्धलेखनाकडे विशेष लक्ष द्यावें. भाषा चांगली बसण्याला पुष्कळसें पाठांतर

आणि पुष्कळसें लेखन उपयोगीं पडतें. इतिहास विषयाचा अभ्यास करतांना उगाच सनावळ्या घोकीत बसूं नये. इतिहासांतील प्रसिद्ध पुरुष नि त्यांच्या उलाढाली यांचें चांगलें मनन करावें. कांहीं महत्त्वाच्या सनाचें नकाशासारखें टांचण करून तें खोलींतील भिंतीवर डकवावें आणि जाता येतां पाहात असावें. म्हणजे आपोआप ते सन पाठ होतात. लढायाच्या हकीगतीबरोबर नकाशे काढून कोणतीही लढाई चांगली समजून घ्यावी. आपल्या खोलींत जर बऱ्याचशा ऐतिहासिक कर्त्या पुरुषाच्या तसबिरा लावतां आल्या तर इतिहासाच्या अभ्यासाला चांगली मदत होईल.

कृष्णा—गणिताचा अभ्यास कसा करावयाचा?

गुरुजी—हें पहा, उदाहरणें सोडवितांना नेहमीं रितीकडे चांगलें लक्ष दिलें पाहिजे. ज्याला रीत चांगली समजते तोच उदाहरण चागलें सोडवितो. कांहीं मुलाची पद्धत अशी असते कीं उदाहरणाचीं उत्तरें पाहून किंवा पाठ करून ठेवावयाचीं. परंतु तें सर्वथैव वाईट आहे. बेरीज वजाबाकी करताना तुमचें उत्तर कदाचित चुकेल नि तें चुकलें तरी चालेल, परंतु रीत चागली समजून घ्या. आंकडे व्यवस्थितपणें घालण्याचा परिपाठ अवश्य ठेवा.

चंपावती—भूगोलाचा अभ्यास कसा करावा?

गुरुजी—भूगोलाचा अभ्यास नकाशावरून करावा. नकाशा डोळ्यांपुढें असला म्हणजे भूगोलाचा अभ्यास चट्चट् होतो. भूशलाका-भूशिर याच्या नुसत्या व्याख्या घोकीत बसूं नये. सकाळी अभ्यासास बसल्याबरोबर पहिल्यानें भाषाविषयाचा अभ्यास उरकून टाकावा. नंतर उदाहरणें सोडवावीं. पुढें इतिहास भूगोल

यांचा अभ्यास करावा आणि लिहिण्याचें काम अगदीं शेवटीं करावें. अभ्यासा संबंधानें विशेषतः त्याच्या पद्धतीसंबंधानें तुम्ही आपल्या गुरुजनांना विचारीत जा. ते तुम्हांला योग्य सूचना देतील.

रामनाक—सकाळीं किती तास अभ्यास करावयाचा!

गुरुजी—७ ते १०॥ वाजे पर्यंत तुम्हीं अभ्यास केला पाहिजे. ही सकाळचीच वेळ अभ्यासाला योग्य असते. वर्गांत सर्व विषय लक्षपूर्वक ऐकणें आणि घरीं आतां सांगितल्याप्रमाणें अभ्यास करणें या दोन गोष्टी तुम्हीं लक्षांत ठेविल्या म्हणजे परीक्षेंत तुम्हांस कधींही अपयश येणार नाहीं आणि घरींदारीं, शाळेंत, सगळीकडे मास्तरांवर मास्तर ठेवून आईबापाना त्रास नि खर्च देण्याचा प्रसंग येणार नाहीं.

यया—संध्याकाळीं शाळेंतून घरीं आल्यावर पुन्हां अभ्यास करावयाचा काय?

गुरुजी—नाहीं. सकाळीं तीन तास अभ्यास आणि पुढें शाळेंत ही पांच वाजतपर्यंतचा बौद्धिक कार्यक्रम. त्यामुळें बुद्धीला अतिशय ताण पडलेला असतो. म्हणून तुम्ही संध्याकाळीं घरीं आल्यावर जर अभ्यास केलात तर खचितच तुमचा मेंदु दुर्बल होईल. पुष्कळ मुलें असला मूर्खपणा करितात. पण त्यामुळें त्यांची बुद्धि दुर्बल होते. शरीर अशक्त होतें, आरोग्य नाहींसें होतें. खाल्लेलें अन्न पचत नाहीं. जरा थंडी पडली की शरीर गारठतें. जरा ऊन लागलें कीं डोकें भणभणतें. कधीं खोकला, कधीं पडसें, कधीं अपचन, कधीं पोटात मुरडा, कधीं डोकें दुखणें, असले सर्व विकार या विद्यार्थ्यांना जडतात आणि ते पाप्याचे पितर बनतात. तेव्हां शाळेंतून

आल्यापासून म्हणजे ५॥ ते ७॥–८ पर्यंत हातांत पुस्तक न धरण्याचीच तुम्ही प्रतिज्ञा केली पाहिजे.

पुरुषोत्तम—संध्याकाळीं घरीं आल्यावर गंजिफा नि पत्ते खेळण्याला काय हरकत आहे?

गुरुजी—या वेळीं तसले खेळ म्हाताऱ्या कोताऱ्यांनीं खेळावेत. तरण्याबाड पोरांनीं उघड्या हवेंत खेळणें, पळणें, उड्या मारणें, मस्ती करणें, कांहीं तरी करून अंगांतून चांगला घाम येईल असा व्यायाम घेतला पाहिजे. सायंकाळीं भोजनाची वेळ होईपर्यंत २–२॥ तास खेळण्यांत किंवा व्यायामांत गेले म्हणजे दिवसभर अभ्यासामुळें आलेला बुद्धीचा शीण नाहींसा होतो. भूक चांगली लागते. त्यामुळें अन्नही रुचकर लागतें. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे रात्रीं भोजन झाल्याबरोबर केव्हां एकदां निजेन असें होतें नि अंथरुणाला पाठ लागतांच विद्यार्थी घोरूं लागतो.

गोपाळ—रात्रीचा अभ्यास करावा का न करावा?

गुरुजी—रात्रीं भोजनानंतर १० ।१५ मिनिटें विश्रांति घेऊन तास अर्धा तास फारतर अभ्यास करावा. तोही सामान्य वाचनाचा करावा. भाषाविषयाचे जे धडे वर्गांत झाले असतील त्यावर फक्त एकदा नजर टाकावी. लहान मुलांनीं नऊ वाजतांच निजावें. १५–१६ वर्षांच्या मुलांनीं मात्र ९॥ पर्यंत जागावें. १० च्या पुढें कोणाही विद्यार्थ्यानें जागूं नये. अभ्यासाची मुख्य वेळ पहाटेची नि सकाळची. ती सोडून भलत्यावेळीं अभ्यास करणें, रात्रीच्यारात्रीं जागरणें करणें, झोप येऊं नये म्हणून चहाचे कपावर कप उडविणें असल्या सर्व तऱ्हा ज्यांना मृत्यूला लवकर आमंत्रण द्यावयाचें असेल त्यांनींच कराव्या. तुमच्या सारख्या विद्यार्थ्यांनीं बिलकुल करूं नयेत.

---

## बाराव्या पाठाची पुरवणी.

### उद्योगपर्व अध्याय ३७ वा.

बल पचविध नित्य पुरुषाणा निबोध मे
यत्तु बाहुबल नाम प्रथम बलमुच्यते ॥ ५२ ॥
येन लब्धानि सर्वाणि सगृहीतानि भारत
यद्बलाना बल श्रेष्ठ तत्प्रज्ञाबलमुच्यते ॥ ५५ ॥

### समर्थ स्फुट कविता प्रकरण ६७

श्लोक २६ त ३३ व ४२–४३

शक्तीनें पावती सुखें । शक्ती नस्तां विटबणा
शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगितां दिसे ॥ १ ॥
कोण पुसे अशक्ताला । रोगीसें बराडी दिसे
कळा नाहिं कांति नाहीं । युक्ति बुद्धि दुरावली ॥ २ ॥
साजिरी शक्ति तों काया । काया मायाचि वाढवी
शक्ति तों सर्वहि सुखें । शक्ति आनद भोगवी ॥ ३ ॥
सार ससार शक्तीनें । शक्तीनें शक्ति भोगिजे
शक्त तो सर्वहि भोगी । शक्तावीण दरिद्रता ॥ ४ ॥
शक्तीनें मिळतीं राज्यें । युक्तीनें यत्न होतसे
शक्ति युक्ति जयें ठाईं । तयें श्रीमत धावती ॥ ५ ॥
उदड खस्तिचीं कामें । मर्द मारुनि जानसे
नामर्द काय तें लढी । सदा दुश्चीत आळशी ॥ ६ ॥
असो हें बोलणें जालें । युक्तीवीण कामा नये
युक्तीला पाहिजे शक्ति । तस्मात शक्ति प्रमाण हे ॥ ७ ॥

## मोरोपंत.

कृष्ण म्हणे गा भीमा मतिबळ वळ होंचि मान्य सुकवीतें
भुजवळ तें एकादे समयीं तत्काळ ओंठ सुकवीतें ॥
ज्ञानासि लोचनाहुनि फार जपावें म्हणोनि सुज्ञानें
धर्म म्हणे गा शकुने न कुनेत्रे जाय रूप कुज्ञानें ॥

## अभ्यास ( योगवासिष्ठ, निर्वाणप्रकरण )

पुण्यानि यान्ति वैफल्यं । वैफल्यं यान्ति मातरः
भाग्यानि यान्ति वैफल्यं । नाभ्यासस्तु कदाचन ॥ ३२ ॥
दुःसाध्याः सिद्धिमायान्ति । रिपवो यान्ति मित्रताम्
विषाण्यमृततां यांति । संतताभ्यासयोगतः ॥ ३३ ॥
येनाभ्यासः परित्यक्त । इष्टे वस्तुनि सोऽधमः
कदाचिन्न तदाप्नोति । वंध्या स्वतनयं यथा ॥ ३४ ॥
यथा कल्पद्रुमलताः । सचिंतामणयो यथा
फलन्ति शरदश्चैता । स्तथैवाभ्यासभूमयः ॥ ३९ ॥
सर्वस्य जंतुजातस्य । सर्ववस्त्ववभासने
सर्वदैवैक एवोच्चै । र्जयत्यभ्यासभास्करः ॥ ४१ ॥
पौनः पुन्येन करणमभ्यास इति कथ्यते
पुरुषार्थः स एवेह । तेनास्ति न विना गतिः ॥ ४३ ॥

## ज्ञानेश्वरी अध्याय १२.

अगा अभ्यासयोग म्हणिजे । तो हा एक जाणिजे । येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥ ११० ॥ पैं अभ्यासाचेनि

वळें। एका गति अंतराळें । व्याघ्र सर्प प्रांजळे। केलें एकीं ॥ १११ ॥ विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे । एकीं वाग्ब्रह्म थोकडें । अभ्यासें केलें ॥ ११२ ॥ म्हणोनि आभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं । या लागीं माझ्या ठाईं ॥ अभ्यासें मिळें ॥ ११३ ॥

## तुकाराम.

साधूनीं वचनाग खाती तोळा तोळा ।
आणिका तें डोळा न पाहवें
साधूनीं भुजग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनिया ॥
असाध्य तें साध्य करिता सायास ।
कारण अभ्यास तुका म्हणे

## सुभाषित.

*य पठति लिखति पश्यति परिपृच्छति पंडितानुपाश्रयति*
तस्य दिवाकर किरणैर्नलिनीदलमिव विकास्यते बुद्धिः ।

---

# पाठ तेरावा.

## शील.

गुरुजी—मुलांनो, शरीरबळ आणि बुद्धिबळ मिळविण्याचा कसकसा अभ्यास करावा हें मीं तुम्हांला गेल्या पाठांत सांगितलें. परंतु बुद्धिबळाचा नि शरीरबळाचा योग्य उपयोग होण्यास तुमच्या अंगीं इतर बरेचसे सद्गुण पाहिजेत.

रामनाक—कोणकोणते सद्गुण आमच्या अगीं असावे बरें?

गुरुजी—तुम्हाला माणुसकी म्हणजे काय माहीत आहे?

गंगू—माणुसकी म्हणजे मनुष्यपणा.

गुरुजी—मनुष्यपणा अगीं येण्याला कृतज्ञता, परोपकार, प्रामाणिकपणा, सभ्यता, उद्योग, आत्मसंयमन, धैर्य, साहस, कळकळ, वगैरे सद्गुण पाहिजेत. या सर्व सद्गुणाना एक नाव आहे तें कोणाला ठाऊक आहे?

मुलें—नाहीं.

गुरुजी—माणुसकीला उचित अशा सद्गुणसमूहाला शील असें म्हणतात. हें शील अगीं असल्याशिवाय बुद्धिबल नि शरीरबल याचा काहीं उपयोग होत नाहीं. मनुष्य मोठा बुद्धिमान् आहे आणि चांगला पहिलवान आहे. पण त्याच्या अगीं प्रामाणिकपणा नाहीं नि कृतज्ञता नाहीं तर त्याच्या बुद्धिबलाचा नि शरीरबलाचा योग्य उपयोग होईल काय?

गंगू—उपयोग न होता दुरुपयोग होईल

गुरुजी—विद्यार्थिदशेंत तुम्ही चागल्या सवयी लावून घेऊन चांगले गुण सपादन केले पाहिजेत. मनुष्याच्या अन्त करणात बरे-वाईट दोन्ही गुण असतात, परतु दुर्गुणाना घालविणें, निदान त्यांना सद्गुणाचे सेवक बनविणें, हें मनुष्याचें काम आहे. हें काम विद्यार्थिदशेंतच होतें. म्हणून तुम्ही विद्या आणि शरीरबल याचा अभ्यास करता करता शीलाचाही अभ्यास करा. आईबापानी आपल्या मुलाना काय द्यावें असें तुम्हास वाटतें?

मुलें—घरदार, शेतभात, पैसाअडका द्यावा.

**गुरुजी**—नाहीं. आईबापांनीं मुलांना पैसा ठेवूं नये, घरदार ठेवूं नये, तर मोरोपंत कवि म्हणतात त्याप्रमाणें 'द्यावें शीलचि द्यावें केवळ व्हाया न घात वसु तातें' म्हणजे बापानें मुलाचा घात होऊं नये म्हणून वसु म्हणजे जमीन आणि संपत्ति न देतां आपलें शील अर्थात् आपलें सद्वर्तन मुलांना द्यावें. बाप जें शील अर्थात् सद्गुण मुलाला देईल त्याची किंमत फार आहे. मुलगा दिवटा निघाला आणि बापानें त्याच्या करितां लक्षावधि रुपये मिळवून ठेविलेले असले तर मुलगा ते एका दिवसांत नाहींतसे करील; म्हणून शीलाचें महत्त्व विशेष आहे. मुलांनो, हिंदुस्थान देशावर हल्लीं कोणाचें राज्य आहे?

**पुरुषोत्तम**—इंग्रजांचें राज्य आहे. परंतु स्वराज्य मिळविण्याची पुष्कळ लोक खटपट करीत आहेत.

**गुरुजी**—स्वराज्य कशानें मिळेल असें तुम्हांस वाटतें?

**रामचंद्र**—इंग्रजांनीं ज्या गुणांनीं राज्य मिळविलें ते गुण आमच्या अंगीं आले म्हणजे आम्हांस स्वराज्य मिळेल, असें मला वाटतें.

**गुरुजी**—बरोबर बोललास. इंग्रज लोकांची राष्ट्रभक्ति, देशाभिमान, जूट, शिस्त हे सद्गुण विशेष आहेत. त्यांच्या ठिकाणीं एक प्रकारचें शील आहे. तें शील तुमच्या अंगीं आलें म्हणजे तुम्ही खालीनें स्वराज्यास पात्र व्हाल.

**रामनाक**—शीलानें गेलेलें राज्य परत मिळवितां येतें काय?

**गुरुजी**—शीलानें गेलेलें राज्य मिळवितां येतें इतकेंच नव्हे पण त्रैलोक्यही जिंकतां येतें. 'शीलेन हि त्रयो लोका शक्या जेतुं न

संशय: ' शीलानें निःसंशय तीन्ही लोक जिंकता येतात असें धृतराष्ट्रानें दुर्योधनाला एका प्रसंगीं सांगितलें आहे.

**धोंडिबा**—धृतराष्ट्रानें दुर्योधनाला शीलाचा उपदेश करण्याचें कारण काय?

**गुरुजी**—धर्मराजाला छळण्याचे दुर्योधनानें सर्व प्रकार केले. द्यूतांत जिंकिलें, सभेंत फजीती केली नि वनवासाला पाठविलें. तथापि कांहीं केल्या धर्मराजाचा बोलबाला कमी होईना म्हणून तो रडूं लागला. मुलगा कोपऱ्यात मुळूमुळू रडत आहे असें ऐकून धृतराष्ट्रानें त्याला बोलाविलें आणि धर्मराजाच्या सारखा तुझा लौकिक व्हावा असें जर तुला वाटत असेल तर शीलवान् हो असा उपदेश केला.

**गोपाळ**—धृतराष्ट्रानें काय काय उपदेश केला?

**गरुजी**—धृतराष्ट्रानें दुर्योधनाला शीलाच्या मोठेपणाबद्दलची एक मजेदार गोष्ट सांगितली. ती मी तुम्हांला सांगतों.

## शील—महती.

पूर्वी एकदा देवदैत्यांचें मोठें युद्ध झालें. त्या युद्धांत देवांचा पराभव झाला. दैत्य कुलोत्पन्न प्रल्हादानें इंद्राचें राज्य घेतल्यामुळें निभ्रभ्रष्ट झालेल्या इंद्राला फार वाईट वाटलें आणि तो गेलेलें राज्य परत कसें मिळवावें याचा विचार करूं लागला. इंद्रानें देवगुरु बृहस्पतींना विचारलें. त्यांनीं दैत्यगुरु शुक्राचार्यांकडे बोट दाखविलें. शुक्राचार्यांनीं इंद्राला सांगितलें कीं तुला जें पाहिजे आहे तें दैत्यपुत्र प्रल्हादाकडूनच मिळेल. इंद्र बटुरूपानें प्रल्हादाकडे गेला. परंतु त्यानें बोलावयालाही मला वेळ नाहीं असें म्हणून त्याला

वाटाण्याच्या अक्षता लाविल्या. वेषधारी इंद्रानें निश्चयानें तेथेंच तळ दिला. कांहीं दिवस उत्कृष्ट रीतीनें सेवा करून प्रल्हादास प्रसन्न करून घेतलें. एके दिवशीं प्रल्हाद म्हणाला तुला काय विचारावयाचें तें विचार. वेषधारी इंद्र म्हणाला, तुला त्रैलोक्याच्या अधिपतीची योग्यता कोणत्या गुणांनीं मिळाली तें सांग. नंतर प्रल्हादानें आपल्या सर्व सद्गुणाचा नि वर्तनाचा पाढा त्याच्यापुढें वाचला. प्रल्हाद म्हणाला, ' मी कोणत्याहि कामांत विद्वानाचा विचार घेतों आचारसंपन्नाचें अनुकरण करितों. विनाकारण कोणावर रागावत नाहीं. कोणाचा मत्सर करीत नाहीं सत्य भाषण करतों. केलेले उपकार जाणतों बंधु, मित्र आणि आश्रित या सर्वांना ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें वागवितों. मधमाशा जशा मध गोळा करितात तसा मी सदुपदेश संग्रह करीत असतो प्रजेच्या तंत्रानें राज्य करीत असतों. म्हणून मी त्रैलोक्याचा अधिपति झालों आहें असें मला वाटतें. बरें ब्राह्मणा तू आतां माझी बरेच दिवस सेवा केली आहेस, तुला काय पाहिजे तें मांग.' असें शेवटीं प्रल्हाद म्हणाला वर माग म्हटल्यावर इंद्र बराच गोंधळला, काय मागावें हें त्याला सुचेना. शेवटीं 'ज्या शीलाच्या योगानें तू त्रैलोक्याचा अधिपति झाला आहेस तें शील मला दे ' असें वेषधारी इंद्र म्हणाला शील मागितल्याबरोबर प्रल्हाद चपापला. पण करता काय? नाइलाजानें त्यानें त्याच्या हातावर पाणी सोडलें इंद्र निघून गेला. तों प्रल्हादाच्या शरीरांतून शील या नांवाचें एक दिव्य तेज बाहेर पडलें. त्या तेजानें मी त्या ब्राह्मणामध्यें जाऊन वास्तव्य करणार असें सांगितलें. शील नांवाचा दिव्य तजोरूपी पुरुष त्या दैत्याच्या शरी-

रांतून बाहेर पडल्यावर दुसरा धर्म या नांवाचा पुरुष त्या दैत्याला सोडून निघाला. धर्मपुरुषाच्या मागोमाग सत्य गेलें, सदाचार गेला आणि शेवटचा बळ नांवाचा गुणही तेजस्वी पुरुषवेषानें बाहेर पडला. आपल्या शरीरांतून सर्व सद्गुण पुरुषवेषानें बाहेर पडत आहेत, हें पाहून प्रन्हाद गर्भगळित झाला. इतक्यांत त्याच्या शरीरांतून एक तेजस्वी स्त्री बाहेर पडली. प्रन्हादानें तिला साष्टांग नमस्कार घातला नि 'आपण तरी राहा' अशी विनंति केली. ती दिव्य स्त्री म्हणाली बाबा मी लक्ष्मी आहे. आजपर्यंत तुझ्या राज्यांत मी राहात होतें परंतु तूं आतां शील, धर्म, सत्य, सदाचार आणि बळ या गुणांचा त्याग केल्यामुळें निर्बळ झाला आहेस. निर्बळाजवळ लक्ष्मी कशी बरें राहील? असें म्हणून ती स्त्री निघून गेली. याप्रमाणें देवांचा राजा इंद्र हा शीलसंपन्न झाल्यामुळें लौकरच त्रैलोक्याचा अधिपति झाला. इकडे प्रन्हाद शीलविहीन झाल्यामुळें लवकरच राज्यभ्रष्ट झाला.

गंगू—गोष्ट फार चांगली आहे. पण आम्हांला इंद्राप्रमाणें कोणी शील देईल काय?

गुरुजी—अग, शील हा पदार्थ देण्याघेण्याचा नाहीं. वरील गोष्टीचें तात्पर्य असें कीं, प्रल्हादाच्या अंगचे सद्गुण इंद्रानें समजून घेतले आणि ते आपल्या अंगीं आणले. तुम्हीही तुमच्या हल्लींच्या विद्यार्थिदशेंत ते सर्व सद्गुण शिका.

कृष्णा—हे सद्गुण कसे शिकावयाचे?

गुरुजी—ज्या माणसाजवळ जो गुण असेल त्याकडून तो गुण घ्यावा. अवधूत या महान साधूची कथा भागवतात आहे.

त्यांनीं २४ गुरु केले होते. एकेका गुरूपासून ते एकेक गुण शिकले तुम्हांलाही माणुसकीच्या दृष्टीनें जे जे सद्गुण हवे असे वाटतील ते ते सर्व शिका आणि शीलसंपन्न व्हा

---

## तेराव्या पाठाची पुरवणी.

### महाभारत उद्योगपर्व अध्याय ३४.

जिता सभा वस्त्रवता । मिष्टाशा गोमता जिता ।
अध्वा जितो यानवता । सर्वं शीलवता जितम् ॥ ४८ ॥
शील प्रधान पुरुषे । तद्यस्येह प्रणश्यति
न तस्य जीवितेनार्थो । न धनेन न बन्धुभिः ॥ ४९ ॥
यदीच्छसि श्रियं तात । यादृशी सा युधिष्ठिर ।
विशिष्टा वा नरश्रेष्ठ । शीलवान् भव पुत्रक ॥ १४ ॥
शीलेन हि त्रयो लोका । शक्या जेतुं न संशयः ।
नहि किंचिदसाध्यं वै । लोके शीलवता सताम् ॥ १५ ॥

### महाभारत शान्तिपर्व अध्याय १२४

( धृतराष्ट्र म्हणतो )

अद्रोह सर्वभूतेषु । कर्मणा मनसा गिरा ।
अनुग्रहश्च दानंच । शीलमेतत्प्रशस्यते ॥ ६६ ॥
यदन्येषां हितं न स्यादात्मनः कर्म पौरुषम् ।
अपत्रपेत वा येन । न तत्कुर्यात्कथंचन ॥ ६७ ॥
तत्तु कर्म तथा कुर्याद्येन श्लाघ्येत संसदि
शीलं समासेनैतत्ते । कथितं कुरुसत्तम ॥ ६८ ॥

ऐश्वर्यस्य विभूषणं सुजनता शौर्यस्य वाक्संयमो
ज्ञानस्योपशमः कुलस्य विनयो वित्तस्य पात्रे व्ययः
अक्रोधस्तपसः क्षमा बलवतां धर्मस्य निर्व्याजता
सर्वेषामपि सर्वकारणमिदं शीलं परं भूषणम् ॥ भर्तृहरी ॥

## मोरोपंत.

ऱ्ही सत्य नीति आर्जव जिकडे तिकडेचि धर्म जाणावा
जिकडे धर्म तिथें प्रभु जाय न लागे स्तवूनि आणावा ॥
या सत्य धर्म जिकडे तिकडे श्रीकृष्णनाथ जाणावा
हा तेथें जय रविसा प्रार्थुनि न लगे प्रकाश आणावा ॥

---

# पाठ चौदावा.

## मातृभूमी.

गुरुजी—मुलांनो, मातृभक्ति, पितृभक्ति, गुरुभक्ति, वृद्धसेवा, शिष्टाचार, शौचधर्म, अभ्यास आणि शील हीं जीं तुमचीं विद्यार्थि दशेंतील कर्तव्यें यासंबंधींचा विचार आतांपर्यंत केला. या पाठात मातृभूमीवर प्रेम कां करावें, कसें करावें, हें मीं तुम्हास सांगणार आहे.

ग्यानबा—मातृभूमि म्हणजे काय?

गुरुजी—जी आपल्याला जन्म देते तिचें नाव काय?

ग्यानबा—जी जन्म देते तिला आई म्हणतात.

गुरुजी—ज्या भूमीवर आपण जन्माला येतों त्या भूमीला मातृ-

भूमि असें म्हणतात. माता ही जशी पूज्य आहे ) तशीच मातृभूमीही पूज्य आहे. तुमच्या मातृभूमीचें नाव काय?

मुलें—हिंदुस्थान.

गुरुजी—आपल्या मातृभूमीला आज हिंदुस्थान म्हणतात. पूर्वी आर्यावर्त, भारतवर्ष, भरतखण्ड अशीं नावें होतीं. हिंदुस्थान ही आमची मातृभूमि आहे, हा आमचा स्वदेश आहे. स्वदेशावर प्रेम करणें हा धर्म आहे.

गगू—स्वदेशावर प्रेम का करावें?

गुरुजी—आईवर प्रेम का करावें?

गंगू—आईचे लहानपणापासून आपणावर पुष्कळ उपकार झालेले असतात म्हणून.

गुरुजी—आपले पूर्वज, वाडवडील, आपले लोक, आपला समाज आणि स्वत. आपण या सर्वांवर आपल्या मातृभूमीनें पुष्कळ उपकार केलेले आहेत. या सर्वांचें संगोपन नि पालनपोषण मातृभूमीनें केलें आहे म्हणून मातृभूमीवर प्रेम केलें पाहिजे. मनुष्याला एकंदर तीन प्रकारचीं कर्तव्यें करावीं लागतात. हें तुम्हाला ठाऊक आहे?

कृष्णा—नाहीं.

गुरुजी—मनुष्याला देह, देश, आणि देव यासंबधांचीं कर्तव्यें करावयाचीं असतात. तुम्ही विद्यार्थ्यांनीं प्रातःस्मरण करणें, सकाळ-संध्याकाळ ईशस्तवन करणें, स्तोत्रें म्हणणें, रात्रीं निजताना ईश्वराला शरण जाणें, हीं तुमचीं विद्यार्थिदशेंतील ईश्वरविषयक कर्तव्यें आहेत. व्यायाम, स्वच्छता, पावित्र्य, नियमितपणा, आई-

बापांचें ऐकणें, हीं तुमचीं देहासंबंधाचीं कर्तव्यें आहेत. आतां देशासंबंधाचीं कर्तव्यें काय आहेत हें सांगण्याकरितां देशाचें महत्व किती आहे हें पहा. हिंदुस्थानदेश हा ईश्वराचा लाडका आहे. याला ईशनिवासस्थान असें म्हणतात. भगवंतानें भक्तांचें संरक्षण करण्याकरिता मत्स्य कूर्म इत्यादि दशावतार येथें धारण केले, परमेश्वराच्या श्वासोछ्वासापासून या भूमींतच वेदांची उत्पत्ति झाली. भगवान् व्यास, जैमिनी, पाणिनि, पतंजलि, गौतम, कणाद नि कपिल असे महान् महान् शास्त्रकर्ते येथेंच निर्माण झाले. वसिष्ठ, विश्वामित्र, वामदेव, भरद्वाज, अत्रि, असे ऋषि याच आर्यावर्तांत होऊन गेले. जनकासारखे राजयोगी, शुकासारखे त्यागी, कर्णासारखे दाते, अर्जुनासारखे धनुर्धर, नल, राम, युधिष्ठिरासारखे प्रजावत्सल राजे, सीता, सावित्री, दमयंती, मंदोदरी, याच्या सारख्या जगत्पूजनीय पतिव्रता ज्या आपल्या देशात होऊन गेल्या त्याची थोरवी कोठवर वर्णावी? मुलानो, पूर्वीच्या गोष्टी सोडून दिल्या, तथापि अलीकडे सुद्धा चंद्रगुप्त, समुद्रगुप्त, अशोक, कनिष्क, हर्षवर्धन, ललितादित्य, पृथ्वीराज, प्रतापसिंह, शिवाजी, थोरले माधवराव असे थोर राजे याच देशात जन्मास येऊन पराक्रम करून गेले. प्राचीन ऋषिवर्यांप्रमाणें कुमारिल भट्ट, आद्यशंकराचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य, रामानुजाचार्य, भगवान् बुद्ध, जिनेश्वर, चक्रनसनघ्या, कबीर, चैतन्य, नानक, गुरुगोविंद, असल्या धर्मपंथ प्रवर्तकांनीं याच भूमींत जन्मास येऊन लोकाना प्रपंच आणि परमार्थ यांचा मार्ग दाखविला. ज्ञानदेव, नामदेव, चांगदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, रामदास, तुकाराम, जनाबाई याच्यासारख्या संतांनीं याच

भूमींत येऊन लोकांना उपदेशामृत पाजलें. अशा आपल्य मायभूमीवर तुम्ही प्रेम करावयास नको काय? ईश्वराची कृपा या आपल्या भूमीवर कशी आहे पाहा. परमेश्वरानें आपल्या ह्या मातृभूमीभोंवतीं हिमालय, हिंदुकुश, सह्याद्रि, विंध्याद्रि अशा प्रचण्ड पर्वतांनीं तटबंदी केली आहे. गंगा, यमुना, सिंधु, नर्मदा, तापी, कृष्णा, गोदावरी इत्यादि नद्यांनीं या मातृभूमींतील लोकांना मुबलक पाणी देण्याचें पत्करिलें आहे. हिंदुस्थानच्या सारखें हवापाणी तर जगांत क्वचितच असेल. कोठें उष्णकटिबंधांतले तर कोठें शीतकटिबंधांतलें तर कोठें समशीतोष्ण कटिबंधांतलें हवामान या आपल्या मायदेशांत खेळत आहे. आपल्या मायभूमीच्या उदरांत कोठेंना कोठें पाहिजे तितके खनिज पदार्थ भरलेले आहेत. पृथ्वीवरील सर्व प्रकारच्या वनस्पति आपल्या या देशांत होत आहेत. गुजराथ, माळवा, बंगाल, वऱ्हाड, खानदेश या सुपीक प्रांतानीं मुबलक अन्नवस्त्र देण्याचा मक्ता जेथें घेतला आहे त्या ह्या आपल्या मातृभूमींत अन्नवस्त्राची ददात कधीं पडेल काय? पर्वतांनीं जशी तटबंदी केली आहे तशीच महासागरानीं आपल्या देशाभोंवतीं रखवाली चालविली आहे. वाल्मीकीनें जेथें रामायण गुंफिलें ती ही आपली मायभूमी, व्यासानीं महाभारत लिहून सर्वजगाला व्यासोच्छिष्ट केलें तो हा आपला स्वदेश, अनेक कवि, अनेक वीर, अनेक मुत्सद्दी, अनेक कर्ते पुरुष, अनेक साधुसंत ज्या या आपल्या आर्यावर्तांत झाले तो हा देश धन्य नव्हे काय? अशा या देशांत तुम्ही जन्माला आला, जेथें वरील प्रकारच्या पूर्वजांनीं मिळवून ठेविलेला ठेवा तुम्हांकरितां आहे, त्यावर तुम्ही प्रेम का करावें हें तुमच्या लक्षांत आलें काय?

मुलें--होय. आमच्या मातृभूमीची योग्यता आता आम्हाला कळली. पण मातृभूमीवर आम्ही प्रेम कसकसें करावयाचें हें सागाल तर बरें होईल.

गुरुजी —आपल्या देशात निरनिराळ्या धर्माचे, पथाचे, आचार-विचाराचे लोक आहेत. पुष्कळाची भाषाही तुम्हास समजणार नाहीं कांहीं कांहींच्या चालीरीति तुम्हास अगदीं चमत्कारिक वाटतील तथापि त्याच्याशीं तुम्हीं आपलेपणानें वागलें पाहिजे. घरांतली भावडें जशीं एकमेकाशीं वागतात तसें सर्व लोकाशीं तुम्हीं वागलें पाहिजे आपण सर्व बधु आहोंत. एकभावानें आपण वागलों तरच आपल्या मातृभूमीला म्हणजे आईला बरें वाटेल असें तुम्हांस वाटलें पाहिजे. घरीं आईबापाना सुख देण्याची जशी तुमच्यावर जबाबदारी आहे. तशीच मायभूमीच्या सुखाचीहि आहे. तुमचे जे देशबधु अडाणी आहेत त्याना तुम्ही शहाणे केलें म्हणजे तुम्ही देशसेवा केली असें होईल.

कृष्णा—आम्ही शिकत असतांना दुसऱ्यास कसें शिकवावें?

गुरुजी—अरे, स्वत शिकत असतांना आपल्याला जें येईल तें दुसऱ्याला सागावें. तुझ्या घरीं तो सिताराम नोकर आहे त्याचा मुलगा शाळेत जात नाहीं. त्याला तू जेव्हां जेव्हां मूळाक्षरें शिकविलींस तरी ती सुद्धा देशसेवा होईल. तुम्ही स्वत· शिका, आणि जे अडाणी असतील त्यांना शिकवा. तुमचा देश गरीब आहे म्हणून तुम्हीं अगदीं साधेपणानें राहण्यास शिकलें पाहिजे.

चपावती—साधें राहावयाचें म्हणजे मळके कपडे वापरावयाचे? का साखर तूप न खातां अगदीं चिकूपणानें वागावयाचें?

गुरुजी—तसें नाहीं. आपला देश फार गरीब आहे. शंभरातले ऐंशी लोक गरीब शेतकरी आहेत. त्याच्या पोटाला पुरेसें अन्न मिळत नाहीं. हें लक्षात ठेवून तुम्ही चैन करण्याचें बंद करावें. मळके कपडे वापरावे असें कोण म्हणेल? कपडे चांगले वापरा, शरीराचें रक्षण होईल असे वापरा पण ते तुमच्याच देशातले वापरा. तुम्ही जर दुसऱ्या देशांतले कपडे वापरले तर तुमचा पैसा दुसऱ्याच्या देशात जाईल. तेथील लोक जगतील, पण तुमच्या देशातले लोक उपाशीं मरतील.

मोरेश्वर—स्वदेशी वस्तु म्हणजे काय?

गुरुजी—स्वदेशी म्हणजे आपल्या देशातील वस्तु साखर खावयाची झाली तर ती स्वदेशातील खा. कापड, साबण, शाई, टाक, यातील ज्या वस्तु स्वदेशी मिळणें शक्य असल त्याच तुम्ही वापरा. दादाभाई नोरोजी, न्यायमूर्ति रानडे, नामदार गोखले, लोकमान्य टिळक, देशबंधु चित्तरंजन दास महात्मा गांधी या सर्वांनीं स्वदेशीचा पुरस्कार केला. लोकाना स्वदेशीचें व्रत घेण्यास शिकविलें सारांश तुम्ही जितक्या मिळतील तितक्या स्वदेशी वस्तु वापरा.

रामनाक—स्वदेशसेवा केल्यानें काय मिळतें?

गुरुजी—तुझ्या आईचे पाय दुखू लागले नि तू ते चेपू लागलास म्हणजे काय होतें?

रामनाक—आईला बरें वाटतें

गुरुजी—स्वदेशसेवा केल्यानें आपल्या मायभूमीला म्हणजे आपल्या देशबांधवाना सुख होतें. * लोकाना सुख व्हावें याच उद्देशानें

* देशावर प्रेम का व कसें करावें? ही श्री. आपटे यांचा पुस्तकें पहा

जगातल्या उलाढाली देशभक्त करीत असतात. हिंदुधर्माप्रमाणें स्वदेशभक्ताला या लोकीं नि परलोकींही सुख होतें. इहपर साधून देण्याला म्हणजे प्रपंच नि परमार्थ मिळवून देण्याला स्वदेशसेवा हा एक मार्ग आहे.

**रामनाक**—स्वदेशसेवेनें प्रपंच नि परमार्थ साधल्याचे एखादें उदाहरण आहे काय?

**गुरुजी**—पुष्कळ आहेत. मी फक्त तुला व्यासानीं महाभारतात लिहिलेली जन्मभूमिवर प्रेम करणाऱ्या एका पोपटाची गोष्ट सागतों.

**पुरुषोत्तम**—पोपटाची गोष्ट! पोपट! आणि स्वदेशभक्त! काय मजा आहे!

**गुरुजी**—अरे, होय. हिंदुस्थानात एक पोपट स्वदेशभक्त होऊन गेला.

## पोपटाची गोष्ट.

काशीराजा या नावाचा एक राजा होऊन गेला. त्याच्या राज्यात अत्यंत सुशोभित असें एक अरण्य होतें. त्या अरण्यांत सर्व वृक्षाना लाजविणारें असें एक सुशोभित आणि सुंदर आम्र्याचें झाड होतें. त्या झाडाच्या ढोलींत एक पोपट फार दिवसांपासून राहात होता. एके दिवशीं एक पारधी हातात विषारी बाण घेऊन त्या अरण्यात आला त्यानें तो भयंकर विषारी बाण एका हरिणावर सोडला. परंतु तो बाण त्या हरिणास न लागता अत्यत सुदर अशा त्या आम्र-वृक्षाला लागला. विषारी बाण लागताच तो वृक्ष वाळून गेला नि सुमता सोट उभा राहिला. त्या वृक्षाच्या ढोलींत राहात असलेल्या त्या पोपटाचा जन्म त्या वृक्षावरच झाला होता. त्या पोपटाला

आपल्या जन्मभूमीचें ऐश्वर्य गेल्याबद्दल वाईट वाटलें. इतर सर्व पक्षी 'कठिण समय येतां कोण कामास येतो?' या न्यायानें उडून गेले. परंतु तो पोपट कांहीं झालें तरी ही जन्मभूमि सोडावयाची नाहीं अशा निश्चयानें तेथेंच राहिला. परंतु त्या बिचाऱ्याला खावयाला पान, फळ, यांहींही न मिळाल्यामुळें तो मरणास टेकला. य कथित् पोपट तो काय, पण त्याचा जन्मभूमीबद्दलचा तो अभिमान ऐकून स्वर्गांतील इंद्रही आश्चर्यचकित होऊन ब्राह्मणवेषानें खालीं आला. इंद्र त्या वृक्षाजवळ गेला. हे पोपटा, आतां हा वृक्ष सोड. तुझ्या आसपास फळांनीं फुलांनीं भरलेले दुसरे सुंदर वृक्ष आहेत त्याच्यावर तू उडून जा. उगाच हट्टानें येथें मरू नकोस असें म्हणाला. पोपटानें त्या वेषधारी इंद्राला तेव्हांच ओळखिलें आणि 'हे देवराजा इंद्रा, तू सामान्य माणसासारखा उपदेश मला का करतोस?' असा त्यानें त्याला प्रश्न केला. पोपटानें आपल्याला ओळखिलें, हें पाहून इंद्र खजील झाला. तो पुन्हा म्हणाला अरे, या वृक्षावर फळ नाहीं, दुसरे कोणी पक्षी नाहींत, थंडगार छाया नाहीं, अन्न पाणी मिळण्यासारखें कांहीं नाहीं असें असताना तू येथें का राहिला आहेस? पोपट दुःखाचा सुस्कारा टाकून म्हणाला 'देव सुद्धां भलताच उपदेश करूं लागले तर मनुष्याचें काय होईल बरें? हे देवराजा इंद्रा माझ्या वाडवडिलांचें कल्याण याच वृक्षाच्या आश्रयानें झालें, माझा जन्म याच वृक्षावर झाला. लहानाचा मोठा मी येथेंच झालों अनेक प्रकारचे सद्गुण मला येथेंच मिळाले, अशा माझ्या या मातृभूमीकरितां मी जर मेलों तर माझ्या जन्माचें सार्थक नाहीं का होणार? हे निष्पाप इंद्रा, माझ्या वृक्षाला आज वाईट दिवस आले आहेत परंतु माझ्या

या वृक्षाचा भूतकाल उज्ज्वल आहे. मी भूतकालाकडे पाहात दिवस काढीत आहे. ज्याचा भूतकाळ उज्ज्वल आहे, त्याला भविष्य काळही चागला येणार असें शाहणे म्हणतात.' देवेन्द्र म्हणाला ' हे पोपटा, तूं धन्य आहेस. तुझी मातृभक्ति पाहून मी संतुष्ट झालों आहें, तुला जें मागावयाचें तें खुशाल माग ' पोपट म्हणाला इंद्रा, या वृक्षाला पुन्हां पूर्ववत् सर्व ऐश्वर्य प्राप्त व्हावें. नि माझ्या अन्त.करणात असलेली जन्मभूमीबद्दलची प्रीति अशीच सदोदित दृढ असावी. पोपटाचें तें भाषण ऐकताच इंद्रानें कमंडलूतील पाणी वृक्षावर शिंपडलें नि त्या वृक्षाला पूर्ववत् केलें. इंद्र म्हणाला, हे शुका, तुझ्या वृक्षाला सर्व ऐश्वर्य मिळालें आहे, पाहा. पण तुला स्वत.ला मी स्वर्गांत अक्षय स्थान दिलें आहें हें लक्षात ठेव.

**गंगू**—किती मजेदार गोष्ट आहे ?

**गुरुजी**—मुलानो, या पोपटाच्या गोष्टीवरून तुम्ही बोध घ्या. पोपटानें मातृभूमीच्या भक्तीनें प्रपंच आणि परमार्थ साध्य करून घेतला. तुम्हीही तसेच स्वदेशभक्त बना. वेळ बराच झाला. या सर्व धड्याचें सार थोडक्यात सागरे गोविंदा.

**गोविंदा**—स्वदेशभक्ति करावी हेंच सार आहे.

**गुरुजी**—बरोबर आहे. परतु मी तुम्हाला थोड्या निराळ्या तऱ्हेनें हें सार सागतों. उपनिषदामध्ये मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्यदेवो भव असा उपदेश केला आहे. मी त्याच वाक्या-च्या जोडीला तुम्हाला ' राष्ट्रदेवोभव ' असें सूत्र सागतों. राष्ट्राला देव माना, हा मत्र विसरू नका

## चौदाव्या पाठाची पुरवणी.

### हा हिंददेश माझा.

आनंदकंद ऐसा । हा हिंददेश माझा । ॥ धृ० ॥
सत्यासि ठाव देई । वृत्तीसि ठेवि न्यायीं
सत्रास मानि राजा । हा हिंददेश माझा ॥ १ ॥
जगदीश जन्म घेई । पदवीस थोर नेई ।
चढवी स्वधर्मसाजा । हा हिन्ददेश माझा ॥ २ ॥
जनकादि राजयोगी । शुक, वामदेव त्यागी
घुमर्वाति कीर्तिवाजा । हा हिन्ददेश माझा ॥ ३ ॥
दमयंति जानकी ती । शीलास भूषवीती
नटली नटेश गिरिजा । हा हिन्ददेश माझा ॥ ४ ॥
विश्वास मोह घाली । ऐसी मुकुंदमुरली
रमवी जियें निकुंजा । हा हिंददेश माझा ॥ ५ ॥
गंगा हिमाचलाची । वसती जियें सदाची
होऊनि राहि कलिजा । हा हिंददेश माझा ॥ ६ ॥
पृथुराज सिंह शिवजी । स्वातंत्र्य वीर गाजी
करिती रणांत माजा । हा हिंददेश माझा ॥ ७ ॥
तिलकादि जीव देही । प्रसवूनि धन्य होई
मरतां स्वलोककाजा । हा हिंददेश माझा ॥ ८ ॥
जगिं त्याविना कुणीही । स्मरणीय अन्य नाहीं
थोरांत थोर समजा । हा हिंददेश माझा ॥ ९ ॥

पूजोनि त्यास जीवें । वंदोनि प्रेमभावें
जयनाद ह्याचि गर्जा । हा हिंददेश माझा ॥ १० ॥

## वंदेमातरम्

वंदे मातरम् । सुजला, सुफला, मलयजशीतलाम्
सस्यशामला मातर । शुभ्रज्योत्स्नापुलकितयामिनीम्
फुल्लकुसुमित द्रुमदलशोभिनीम् । सुहासिनीं । सुमधुर-
भाषिणीम् । सुखदा वरदा मातर ॥ १ ॥ त्रिंशत्कोटिकंठ
कलकलनिनादकराले । पष्टिकोटिभुजैर्धृतखरकरवाले
केवले मा तुमि अवले । बाहुबलधारिणीम् । नमामि
तारिणीम् । रिपुदलवारिणीम् । मातरं ॥ २ ॥
तुमि विद्या तुमि धर्म । तुमि हृदि तुमि वर्म । त्व हि
प्राणा शरीरे । बाहुते तुमि मा शक्ति । हृदये तुमि मा भक्ति ।
तोमारी प्रतिमा गरि मंदिरे मंदिरे । त्वं हि दुर्गादशप्रहरण
धारिणी । कमला कमलदलविहारिणी । वाणी विद्यादायिनी
नमामि त्वाम् । नमामि कमला । अमला । अतुला । सुजला
सुफलाम् । मातरं ॥ ३ ॥ श्यामलाम् । सरलाम् । सुस्मि-
ताम । भूषिताम् । धरणीम् । भरणीम् । मातर । वंदे
मातरम् ॥ ४ ॥



## पाठ पंधरावा.

### पंचांग.

*गुरुजी*—मुलांनो, तुम्ही कधीं पंचाग पाहिलें आहे?

*कृष्णा*—आमचे बाबा दररोज पंचाग पाहतात. पूजेचेवेळीं त्यांना अगदीं जवळ लागतें म्हणून देवघरांत त्यांनीं तें टांगून ठेवलेलें आहे.

**रामनाक**—आमच्या घरांत पंचाग वगैरे कांहीं नाहीं. परतु गांवांतील जोशीबुवा आमच्या म्हारवाड्यात केव्हां केव्हां एकादशी, पूर्णिमा, अमावास्या *सांगावयास* येत असतात.

**रामचंद्र**—पचागात काय काय असतें?

**गुरुजी**—पंचांगात पांच अंगें असतात म्हणूनच त्याला पंचांग म्हणतात. तीं अंगें म्हटलीं म्हणजे वार, तिथि, नक्षत्र, योग आणि करण हीं होत. त्या पैकीं वाराचीं नांवें तुम्हांस माहीत आहेत, तीं साग बरें बया.

**बया**—सोमवार, मंगळवार, बुधवार, गुरुवार, शुक्रवार, शनिवार आणि रविवार असे सात वार आहेत.

*गुरुजी*—या सात वाराना इंदुवार, भौमवार, सौम्यवार, बृहस्पतिवार, भृगुवार, मदवार, आणि आदित्यवार अशीं अनुक्रमें दुसरींही नांवें आहेत. हीं सात नावें नि आणखी दोन नावें मिळून नवग्रहाचीं नांवें होतात.

**शांता**—*तीं कशी? ग्रहाचीं नांवें वाराना दिलीं आहेत काय?*

**गुरुजी**—होय. सोम म्हणजे चद्र, मगळ, बुध, गुरु, शुक्र,

शनि आणि रवि म्हणजे सूर्य अशीं सात ग्रहांचीं नांवें आहेत. त्यांत राहू नि केतु हे धरले म्हणजे नवग्रह झाले. पंचांगांत एका कोपऱ्याला बारा घरांचें एक कोष्टक म्हणजे कुंडली काढलेली असते. म्हणजे कुंडलीमध्यें नवग्रहांचीं नांवें आणि ते पूर्णिमेस आणि अमावास्येस कोणत्या राशींत असतात हें लिहिलेलें असतें. बरें, तिथि म्हणजे काय हें सांग पाहू रामचंद्र.

रामचंद्र—तिथि म्हणजे दिवस. एकादशी, पूर्णिमा हीं तिथींचीं म्हणजे दिवसांचींच नांवें आहेत ना?

गुरुजी—चांद्रमानाप्रमाणें चंद्राला उद्देशून ही तिथींची योजना आहे. सर्व आकाशाच्या वर्तुळाचे ३६० अंश धरले आहेत. त्यापैकीं सूर्यापासून बारा अंश दूर जाण्यास चंद्राला जितका काळ लागतो तितक्या काळाला एक तिथि म्हणतात. अशा साधारण १५ तिथींचा एक पंधरवडा होतो. पूर्णिमेपर्यंतचा एक पंधरवडा आणि अमावास्येपर्यंतचा दुसरा पंधरवडा असें समजतात. यांना अनुक्रमें शुक्ल किंवा शुद्ध पक्ष आणि कृष्ण किंवा वद्य पक्ष असें म्हणतात.

अमृतलाल—शुद्ध नि वद्य म्हणजे काय?

गुरुजी—शुक्ल म्हणजे पांढरा, शुद्ध म्हणजे गोरा, चादण्याचा उजेडाचा, पांढरा म्हणजे चादण्याचा पंधरवडा, हा शुद्ध पक्षाचा अर्थ नि त्याच्या उलट कृष्ण म्हणजे काळा, काळोखाचा पंधरवडा म्हणजे कृष्ण पक्ष होय. चादण्या पांख नि काळोखा पांख असें ही या दोन पक्षास म्हणतात. शुद्धपक्षातील म्हणजे चांदण्याच्या पंधरवड्यांतील दिवसांचीं नांवें गोविंदा, तुला सांगतां येतील काय?

**गोविंद**—प्रतिपदा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पचमी, षष्ठी, सप्तमी, अष्टमी, नवमी, दशमी, एकादशी, द्वादशी, त्रयोदशी, चतुर्दशी नि पूर्णिमा.

**गुरुजी**—हीं सर्व तिथींचीं नांवें आहेत. तिथि हा शब्द, स्त्रीलिंगी देखील आहे म्हणून प्रतिपदा तिथि, द्वितिया तिथि, पहिली तिथि, दुसरी तिथि असा अर्थ होतो. पूर्णिमा म्हणजे पूर्णतिथि. त्या दिवशीं चद्राच्या सर्व कला म्हणजे प्रकाशाचीं अगें आपणाला दिसतात. शुक्ल पक्षांत चद्राची एकेक कला म्हणजे प्रकाशाचें अग दररोज वाढतें. कृष्ण पक्षात प्रतिपदेपासून चतुर्दशी पर्यंत एकेक अग कमी होता होता अमावास्येला चद्र मुळींच दिसत नाहीं.

**धोंडबा**—अमावास्येला चद्र का दिसत नाहीं?

**गुरुजी**—चद्र नि सूर्य हे एका राशींत येतात म्हणून चंद्र दिसत नाहीं. परतु एका राशींत येणें म्हणजे काय हा विषय मी तुम्हाला पुढें सागेन. तिथींचीं नांवें तुम्हाला समजलीं ना? शुद्ध पक्षा प्रमाणेंच कृष्ण पक्षातही चतुदशी पर्यंत सर्व तिथि आहेतच. मात्र पूर्णिमेच्या जागीं अमावास्या येवढेंच नाव बदलतें. वार नि तिथि याचीं नावें तुम्हाला समजलीं?

**प्रेमचंद**—होय समजलीं. आता पुढें नक्षत्राचाच विचार ना? आकाशात रात्रीं दिसतात तींच नक्षत्रें ना?

**गुरुजी**—होय, तुम्हां कुणाला नक्षत्राचीं नावें माहीत आहेत काय?

**पुरुषोत्तम**—ओळीनें पाठ येत नाहींत पण श्रवण, हस्त, मृग, रोहिणी, मघा, पुनर्वसु अशीं काहीं नावें ठाऊक आहेत.

गुरुजी—नक्षत्रें सत्तावीस आहेत. अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृग, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वा, उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा आणि रेवती हीं त्यांचीं नांवें आहेत. या सत्ताविस नक्षत्रांच्याच बारा राशी कल्पिलेल्या आहेत त्या सांगशील काय रे मोरेश्वर?

मोरेश्वर—सिंह, कन्या, मकर, कुंभ येवढींच नांवें मला आठवतात.

गुरुजी—एकंदर नक्षत्रें सत्तावीस; प्रत्येक नक्षत्राचे चार पाद किंवा चरण मानले आहेत. मिळून एकंदर १०८ चरण होतात. प्रत्येक राशीला नऊ चरण याप्रमाणें बारा राशी मानलेल्या आहेत. त्यांचीं नावें—मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धन, मकर, कुंभ आणि मीन अशीं आहेत. सव्वादोन दोन नक्षत्रांचा एकेक पुंजका सामान्यतः ज्या आकाराचा दिसतो त्या आकाराचें नांव राशींना दिलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. सारांश नक्षत्रें सत्तावीस नि त्यांच्या राशी बारा आहेत राशींनाच लग्नें असेंही म्हणतात. जसें कुंभ लग्न, मीन लग्न.

आतां योग आणि करण यांचीं नांवें सांगतां का कुणी?

गोपाळ—आमचे काका आज योग वाईट आहे, व्यतिपात आहे, वैधृति आहे असें केव्हां केव्हां म्हणतात. मला ज्यास्त कांहीं ठाऊक नाहीं.

गुरुजी—नक्षत्राप्रमाणें योगही सत्तावीसच आहेत. विष्कंभ, प्रीति, आयुष्मान्, सौभाग्य, शोभन, अतिगंड, सुकर्मा, धृति, शूल,

गंड, वृद्धि, ध्रुव, व्याघात, हर्षण, वज्र, सिद्धि, व्यतिपात, वरियाण, परिघ, शिव, सिद्ध, साध्य शुभ, शुक्र, ब्रम्हा, ऐंद्र आणि वैधृति अशीं योगांचीं नांवें आहेत. करणें अकरा आहेत. त्यांचीं नांवें बव, बालव, कौलव, तैतिल, गरज, वणिज, भद्रा, शकुनि, चतुष्पाद, नाग आणि किंस्तुघ्न अशीं आहेत. गोपाळ, हें घे पंचांग आणि आतां क्रमानें वाचावयास मी सांगतों तसा प्रारंभ कर.

**गोपाळ**—पंचांगाच्या डोक्यावर शके १८४८ असें आहे त्याचा अर्थ काय?

**गुरुजी**—शालिवाहन या नांवाचा एक थोर राजा होऊन गेला. आपल्या या महाराष्ट्रावर आंध्रभृत्य घराण्यांतील शालिवाहनांचें राज्य बरेच दिवस होतें. त्यानें आपल्या नांवाचा शक चालू केला. हल्लींचा जसा सन १९२६ तसाच शक १८४८ म्हणजे शालिवाहन राजाला राज्याभिषेक होऊन १८४८ वर्षे झालीं. नर्मदेच्या उत्तरेस विक्रम शक चालतो त्याला संवत् असें म्हणतात. दक्षिणेस शालिवाहन शक चालू आहे. शके १८४८ क्षयनाम संवत्सर असें वाच.

**संतोबा**—क्षयनाम संवत्सर म्हणजे काय?

**गुरुजी**—क्षय हें चालू वर्षाचें नांव. संवत्सर म्हणजे वर्ष. क्षय या नांवाचें वर्ष असा अर्थ आहे. पंचांग हा ज्योतिष शास्त्राचा विषय आहे. ज्योतिष शास्त्रांत एकंदर साठ संवत्सर मानिले आहेत. साठ वर्षांनंतर पुन्हा पहिल्यापासून वर्षे मोजण्यास सुरवात करावी. प्रभव, विभव, शुक्ल, प्रमोद, प्रजापति, अंगिरा, श्रीमुख, भाव, युव, धाता, ईश्वर, बहुधान्य, प्रमाथी, विक्रम, वृषा, चित्रभानु, सुभानु,

तारण, पार्थिव, व्यय, सर्वजित्, सर्वधारी, विरोधी, विकृति, खर, नंदन, विजय, जय, मन्मथ, दुर्मुख, हेमलंब, विलंब, विकारी, शार्वरी, प्लव, शुभकृत, शोभन, क्रोधी, विश्वावसु, पराभव, प्लवग, कीलक, सौम्य, साधारण, विरोधकृत, परिधावी, प्रमादी, आनद, राक्षस, नल, पिंगल, कालयुक्त, सिद्धार्थी, रौद्र, दुर्मति, दुंदुभि, रुधिरोद्गारी, रक्ताक्षी, क्रोधन आणि क्षय अशीं साठ वर्षांचीं नांवें आहेत. नावाच्या अर्थाप्रमाणें ततोतत त्या वर्षांत घडतें असें नाहीं तथापि आपल्या शास्त्रकर्त्यांनीं बऱ्याच दिवसाच्या अनुभवानें त्यातल्या त्यात हीं सार्थ नावें दिलीं असलीं पाहिजेत.

**गोपाळ**—शके १८४८ क्षयनाम संवत्सर चैत्र शुक्ल पक्ष असेंच पंचांग वाचावयाचें काय?

**गुरुजी**—होय. चैत्र, वैशाख, हीं महिन्यांचीं नावें आहेत हीं तुम्हाला सर्वांना माहीत आहेतच

**बया**—चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आखाड, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गेश्वर, पूस, माघ, शिमगा हीं बारा महिन्याचीं नावें आहेत

**गुरुजी**—आषाढ, मार्गशीर्ष, पौष, असें म्हणावें आणि शिमगा असे न म्हणता फाल्गुन असें म्हटलें म्हणजे बरोबर आहे. हीं महिन्याचीं नावें नक्षत्रावरून पडलेलीं आहेत. विशाखा नक्षत्रावरून वैशाख, श्रवण नक्षत्रावरून श्रावण, मृगशीर्षावरून मार्गशीर्ष इत्यादि. प्रत्येक महिन्याच्या चतुर्दशीस पूर्णिमेस किंवा प्रतिपदेस सायंकाळीं पूर्वेकडे तें तें नक्षत्र दिसत असतें, म्हणूनच नक्ष-

त्राचीं नावें महिन्याना दिलीं आहेत. असो. वर्षाचे महिने बारा आहेत. ऋतु किती आहेत गोविंदा?

गोविंद—ऋतु सहा आहेत. वसन, ग्रीष्म, वर्षा, शरत, हेमन, नि शिशिर. दर दोन महिन्याचा एक ऋतु. चैत्र–वैशाख वसन ऋतु, ज्येष्ठ–आषाढ ग्रीष्म ऋतु इत्यादि.

गुरुजी—ढोबळ मानानें तुझें म्हणणें वरोबर आहे. परतु अगदीं त्याच महिन्यात तो ऋतु संपतो असें नाहीं. थोडें मार्गेपुढेंही होत असतें. परतु मूर्य हा मीनमेष राशींत असला म्हणजे वसत ऋतु, वृषभमिथुनात असला कीं ग्रीष्म, कर्कसिंह–वर्षा, कन्यातूळ–शरत्, वृश्चिकधनु-हेमत नि मकरकुंभ शिशिर हे महिन्यापेक्षा राशींवरून ऋतूचेंच प्रमाण वरोवर वसतें. असो. वर्षाचे महिने बारा. ऋतु सहा आणि अयनें दोन मानिलीं आहेत.

संतोषा—अयन म्हणजे काय?

गुरुजी—अयन म्हणजे सूर्याचा जाण्याचा मार्ग. सूर्य पूर्वेस आपणास दिसतो. परतु तो सहा महिने थोडासा दक्षिणेकडे जातो नि सहा महिने थोडा उत्तरेकडेही सुरुनो. सूर्याच्या या मार्गास दक्षिणायन आणि उत्तरायण असें म्हणतात. तिळगूळ वाटण्याच्या सक्रांतीच्या दिवशीं सूर्य उत्तरेकडे जाऊ लागतो नि सहा महिन्यानंतर दक्षिणेकडे जाऊ लागतो. असो. शके १८४८ क्षयनाम संवत्सर उदगयन ( उत्तरायण ) वसत ऋतु चैत्र शुक्र पक्ष असें वाचावें. हें समजलें काय?

गोपाळ—समजलें. पण १ र. ५।१४ पू. १।५७ असें लिहिलें आहे त्याचा अर्थ काय?

गुरुजी—पंचांगांत निरनिराळीं घरें दिलेलीं आहेत. पहिल्या घरांत तिथीचा आंकडा असतो. दुसऱ्या घरांत वाराचें पहिलें अक्षर दिलेलें असतें. पुढच्या दोन घरांत तिथीच्या घटका आणि पळें हीं लिहिलेलीं असतात. पांचव्या घरांत नक्षत्राचें पहिलें अक्षर लिहिलेलें असतें. पुढच्या दोन घरात त्या नक्षत्राच्या घटका नि पळें हीं असतात. आठव्या घरांत योगाचें आद्याक्षर असतें. पुढच्या दोन घरांत घटका पळें, अकराव्या घरांत करणाचें आद्याक्षर आणि पुढें पूर्वींप्रमाणेंच घटका नि पळें हीं असतात.

गोपाळ—तिथि, वार, नक्षत्र, योग आणि करण यांच्या घटकापळा पुढें दि. फा. मु. इं. अशीं अक्षरें आहेत आणि त्याच्या खालीं कांहीं आंकडे आहेत त्याचा अर्थ काय ?

गुरुजी—दि. म्हणजे दिनमान. चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं साठ घटका पैकीं ती तिथि ३० घ. नि ५० पळें होती असें समजावें. पुढें फा. म्हणजे फारसी, मु. म्हणजे मुसलमानी नि इं. म्हणजे इंग्रजी अशीं नावें असून खालीं त्या त्या महिन्याच्या तारखाचे आंकडे दिलेले आहेत. त्याच्यापुढें र. उ. म्हणजे रवि उदय आणि र. अ. म्हणजे रवि अस्त केव्हां केव्हां होतो याचीं तास नि मिनिटें दिलीं आहेत. शेवटच्या घरांत त्या दिवशीं चंद्र कोणत्या राशींत आहे हें सांगितलेलें आहे

कृष्णा—चंद्र हा दररोज निरनिराळ्या राशींत जातो काय ?

गुरुजी—नाहीं. चंद्र हा सव्वादोन दिवसानीं आपली राशी बदलीत असतो. बारा राशींची फेरी चंद्र अठ्ठावीस एकोणतीस दिवसात पुरी करितो. पंचांगाच्या शेवटच्या घरांत चंद्र कोणती राशि केव्हां सोडतो हेंही दिलेलें असतें.

**चंपावती**—सूर्याच्या राशींचा विचार पंचांगांत नसतो काय?

**गुरुजी**—असतो. सूर्य हा सरासरी एकतीस वत्तीस दिवसांनी आपली राशी बदलतो. पंचाग प्रवर्तक कमेटीच्या पंचांगात चैत्र कृष्ण द्वादशीला मेपार्कः वैशाख कृष्ण त्रयोदशीला वृषभार्कः असें लिहिलें आहे, त्याचा अर्थ त्या दिवशीं सूर्य मेष राशींत गेला, वृषभ राशींत गेला असा आहे, सूर्याच्या या गतीमुळेंच तीन वर्षांनीं एक अधिक महिना धरावा लागतो. तदनुसार यंदा ज्येष्ठ अधिक आहे.

**रामनाक**—अमावास्येला चंद्र सूर्य एका राशींत येतात असें आपण सांगितलें. चंद्र नि सूर्य याच्या गतीनें तें कसें होतें वरें?

**गुरुजी**—चांगली आठवण केलीस. हें पाहा, चैत्र शुद्ध पूर्णिमेला सूर्य मेष राशींत आला आहे. तो वैशाख कृष्ण प्रतिपदे पर्यंत त्याच राशींत राहणार आहे. इकडे चैत्र शुद्ध प्रतिपदे पासून फिरत फिरत चंद्र मेष वृषभ अशा सर्व राशींतून अमावस्येच्या दिवशीं मेष राशींतच येतो म्हणजे सूर्याच्या घरांत येतो. अर्थात् सूर्यापुढें चंद्र फिका पडतो म्हणून तो दिसत नाहीं. अमावस्या या शब्दाचा अर्थही चंद्र सूर्याचा एकत्र राहण्याचा दिवस असाच आहे.

**रामचंद्र**—गुरुजी, वाराला प्रारंभ केव्हा होतो? रविवार संपून सोमवार केव्हा लागला असें समजावयाचें?

**गुरुजी**—रविवारच्या सूर्योदयापासून सोमवारच्या सूर्योदयापर्यंत एक दिवस नि एक रात्र मिळून वार समजावा. दररोज सूर्योदय झाला कीं वार बदलतो. तिथि, नक्षत्रें नि योग ह्यांचा सूर्योदयाशीं संबंध नाहीं. हीं आरंभ झाल्यापासून साठ घटका पर्यंत असतात. क्वचित् सात आठ घटका अधिक उणींही होतात. करणमात्र अर्ध्या तिथीपर्यंत असतें.

गोपाल—कुंडली मध्यें दिलेले ग्रह कोणत्या राशींत आहेत हें कसें समजावें ?

गुरुजी—कुंडलीमध्यें बारा घरें असतात. त्या बारा राशी होत. मेष असें न लिहितां एकाचा आकडा, वृषभ न लिहितां दोहोंचा आंकडा असें बारा राशींचे आकडे नावें न देतां कुंडलींत लिहिलेले असतात. ११ शु. १२ र. बु. असें कुंडलींत लिहिलेलें आहे याचा अर्थ कुंभामध्यें शुक्र आहे मीनामध्यें रवि व बुध आहेत असा समजावा. नांवाच्या पहिल्या अक्षरा वरून जन्मकाळीं कोणतें नक्षत्र असावें व त्या नक्षत्रावरून राशि कशी ओळखावी, राशींचें शुभाशुभ फल कसें पहावें, कुंडलीवरून ग्रहाचें इष्टानिष्ट कसें ओळखावें हा ज्योतिषशास्त्राचा विषय आहे. तुम्हांला सामान्यतः पंचांग पाहता यावें येवढ्याच उद्देशानें ही माहिती पुरेशी आहे.

---

## पाठ सोळावा.

### सण, उत्सव नि व्रतें.

गुरुजी—कृष्णा दिवाळी कोणत्या महिन्यांत असते रे ?

कृष्णा—आश्विनामध्यें असते.

रामचंद्र—नाहीं. कार्तिकांत असते.

गुरुजी—तुम्ही दोघेही बरोबर आहांत. आश्विन वद्य चतुर्दशी पासून कार्तिक शुद्ध द्वितीयेपर्यंत दिवाळीचा सण असतो. श्रावणांत कोणता सण येतो तें तुम्हांला ठाऊक आहे का ?

रामनाक—श्रावणांत नागपंचमीचा मोठा सण असतो. पण हे सण कशाकरितां केले आहेत.

गुरुजी—सण म्हणजे धार्मिक उत्सवाचा दिवस होय. कांहीं कांहीं सणामध्यें धार्मिक गोष्टींवरोबर सामाजिक, राजकीय गोष्टीही मिसळलेल्या आहेत. हिंदुसमाज हा एका बंधनांत, विचारांत आणि ध्येयामध्यें येण्याकरितां अशा सणांची फार जरूरी आहे.

प्रेमचंद—हिंदुसमाजाचें हित जर सण पाळण्यानें होतें, तर त्या सणांची माहिती आम्हांला पाहिजे. ती सांगा म्हणजे त्याप्रमाणें आम्ही वागत जाऊं.

गुरुजी—एकंदर बारा महिन्यांत पुष्कळच सण आहेत. त्या सर्व सणांची माहिती तुम्हांला एका पाठांत देणें शक्य नाहीं. तथापि सर्व हिंदूंच्या दृष्टीनें कांहीं महत्त्वाच्या सणांची माहिती, त्या दिवसाचा आचार आणि विधि मी तुम्हांला सागतों. चैत्रांत मोठा सण म्हटला म्हणजे पाडवा हा होय. रामनवमी, हनुमान् जयंती हेही थोडे फार सणच समजले जातात. पण त्याना सणापेक्षां जयंत्याचे म्हणजे जन्म दिवसांचे उत्सव असें म्हणावें.

दया—पाडव्याचे दिवशीं गुढी उभारावयाची असते.

गुरुजी—चैत्र शुद्ध प्रतिपदा हा आपल्या नव्या वर्षाचा पहिला दिवस होय. हिंदुस्थानच्या सर्व भागात हाच दिवस वर्षारंभाचा असें मानीत नाहींत. कांहीं काही ठिकाणीं कार्तिक शुद्ध प्रतिपदा हा वर्षारंभ मानतात. प्राचीन काळीं मार्गशीर्ष हा वर्षारंभ मानीत. अद्यापि त्याच दिवशीं मोठी दिवाळी म्हणजे देवाची दिवाळी करण्यांत येते. इद्रानें वृत्रासुराला मारून ध्वजा फडकावली ती चैत्र

शुद्ध प्रतिपदेसच. ब्रम्हदेवानें सृष्टि करण्यास आरंभ केला तो हाच दिवस. रामचंद्र सीतेसह अयोध्येस परत आले आणि त्यांनीं विजय-ध्वजा उभारली तो दिवस चैत्र शुद्ध प्रतिपदेचाच होता, असें म्हणतात. पाडव्याच्या दिवशीं आंगण चांगलें स्वच्छ झाडावें. सुंदर रांगोळ्या घालाव्या. मुलामुलींना न्हायला घालून चांगलीं वस्त्रें घाला-वयास द्यावीं. गंध, फूल, हळदकुंकू यांनीं गुढीची पूजा करावी. नैवेद्य दाखवावा, जेवणापूर्वीं हिंग, जिरें, ओंवा घालून कडूलिंबाचीं पानें खावींत. आपले प्राचीन पूर्वज लिंबाच्या पानाचा रस ( अमृत ) पिऊन सतेज असत. म्हणून त्या दिवशीं लिंबाचीं पानें खाण्याची चाल पडलेली आहे. गुढीची म्हणजे ध्वजाची पूजा, लिंब खाणें हीं झाल्यावर पंचांगातील वर्षफल ऐकण्याचा विधि आहे. पुष्कळ ठिकाणीं गांवातील सर्व लोक मिळून सायंकाळीं एकत्र जमून वर्ष-फल ऐकण्याची चाल आहे. नवीन वर्षीं पाऊस किती, पिकें कशीं काय येतील आणि एकंदर वर्ष कसें जाणार हेंच या वेळीं सांग-ण्यात येतें. घरोघरीं मिष्टान्नभोजन, आप्तेष्टास भेटणें, नवीन वस्त्रें वापरणें आणि गावातील प्रमुख देवदेवतांचें दर्शन घेणें असला कार्यक्रम असतो. वर्षाच्या साडेतीन मुहूर्तांपैकीं पाडवा हा एक मुहूर्त म्हणजे चांगला दिवस होय. गेल्या वर्षांत आपण कोणत्या बऱ्यावाईट गोष्टी केल्या, हें आपल्या मनाशीं पडताळून पाहून ह्या वर्षीं चांगल्या गोष्टी करण्याचा निश्चय या सुमुहूर्तावर करावा.

अमृतलाल—पाडव्याची माहिती आणि कर्तव्यें समजलीं. आतां रामनवमी नि हनुमानजयंति यांचे विषयीं सांग.

गुरुजी—प्रभु रामचंद्रांनीं धर्मरक्षणाकरितां, जगाच्या उद्धारा-

करितां आणि साधूंच्या संरक्षणाकरिता चैत्र शुद्ध नवमीस दशरथ राजाची राणी कौसल्या हिचें पोटीं जन्म घेतला. तसाच मारुतीरायानींही रामचंद्राच्या साहाय्याकरिता केसरी नावाच्या वानराची बायको अंजनी हिच्या पोटीं चैत्र शुद्ध पूर्णिमेस जन्म घेतला. श्रीरामचंद्र आणि मारुतीराय यांचें उज्ज्वल चारित्र्य डोळ्यापुढें राहावें म्हणून सर्व हिंदूंनीं हे उत्सव पाळिले पाहिजेत. चैत्रशुद्ध नवमी नि चैत्र शुद्ध पूर्णिमा या दोन्हीं दिवशीं सर्व हिंदू स्त्रीपुरुषानीं उपास करावा, नवमीला दोन प्रहरीं बारा वाजता श्रीरामजन्म करावा. कीर्तन, पुराण, प्रवचन करावें आणि करवावें. पूर्णिमेला सूर्योदयाबरोबर हनुमान्जन्म करावा. सुंठवडा वाटावा. मुलांना मारुतीरायाचें चरित्र समजावून द्यावें. दुसरे दिवशीं मिष्टान्न भोजन करावें आणि गोरगरिबास अन्नदान करावें. *अलीकडे हनुमान् जयंतीच्या* दिवशीं मर्दानी खेळाचे सामने करण्याची चाल पडू लागली आहे ती फार उत्तम आहे. *श्रीराम* आणि मारुतीराय याचे उत्सव म्हणजे ऐतिहासिक दृष्ट्या आर्यसंस्कृतीचा विजय होय.

बया—वैशाख महिन्यांत कोणकोणते मोठे सण आहेत ?

गुरुजी—सर्व हिंदूंना सांगण्यासारखे नि पाळण्यासारखे या महिन्यांत फारसे सण नाहींत. मात्र वैशाख शुद्ध तृतीयेला भगवान् परशुराम याचा जन्म म्हणजे परशुराम जयंति आणि चतुर्दशीला नरसिंह जयंति असते. अक्षय्य तृतीयेचा पूर्वार्ध हा साडेतीन मुहूर्तांतला अर्धा मुहूर्त होय. या दिवशीं दोन प्रहरानंतर पितरांचें श्राद्ध करावयाचें असतें. रामनवमीप्रमाणें नरसिंह जयंतीचा उत्सव दुपारीं न करतां सायंकाळीं आणि रात्रीं करावा. प्रल्हादाकरितां नरसिंह अवतार संध्याकाळीं प्रगट झाला, अशी कथा आहे.

रामनाक---ज्येष्ठामध्यें बेंदराचा सण असतो नाहीं ?

गरुजी---बेंदूर किंवा पोळा हा सर्व हिंदूंचा सण आहे. तो कांहीं ठिकाणीं ज्येष्ठशुद्ध पूर्णिमेस नि काहीं ठिकाणीं आषाढी पूर्णिमेस आणि काहीं ठिकाणीं याच दोन महिन्यात श्रवण किंवा मूळ नक्षत्रावर करितात. हा सण म्हणजे विशेषतः बैलाचाच उत्सव आहे. घरीं मातीच्या बैलाची पूजा करणें, त्याच्या शिंगात कडबोळीं घालणें, बेलाचे खांदे मळणें, त्याना तेल पाजणें, पोहणीस घालणें, रंगविणें, खिचडा खावयास घालणें, सायकाळीं मिरवणूक काढणें असा या सणाचा कार्यक्रम असतो. हिंदुस्थानातील शेतकी ज्या बैलाचे योगानें चालते, ज्यामुळें आपणास अन्न खावयास मिळतें त्या बैलांच्याबद्दल कृतज्ञ राहण्याच्या उद्देशानें हा सण निघाला आहे. पण ज्येष्ठी पूर्णिमेस सर्व हिंदुस्त्रियाकरिता एक चागलें व्रत आहे तें तुम्हास माहीत आहे काय ?

गंगू---तें व्रत वटसावित्रीचें काय ?

गुरुजी---होय, अगदीं बिनचूक बोललीस. हें व्रत तीन दिवसांचें असतें. कित्येक स्त्रिया तें एक दिवसच करितात. हिंदू स्त्रियाचा पतिव्रताधर्म हा मुख्य धर्म आहे. पति चिरायु व्हावा आणि आपणास अखंड सौभाग्य असावें, अशा हेतूनें हें व्रत चालू आहे. पूर्णिमेच्या दिवशीं सर्व स्त्रिया उपवास करतात. काहीं काहीं तर तीन दिवसही उपवास करतात. पुढें सावित्रीची कथा ऐकून हें व्रत सपविण्यात येतें. सर्व हिंदुस्त्रिया या व्रताच्या निमित्तानें एकत्र जमतात. वडाची पूजा करितात त्यामुळें परस्पराच्या भेटी होतात. स्त्रिया हळदकुंकू देतात, ओट्या भरतात, ईश्वर प्रार्थना करितात,

वाणें देतात, गाणीं गातात, ओंव्या म्हणतात आणि बरोबर जातात.

बया—सावित्रीची कथा काय आहे? ती आपण सांगाल तर बरें.

गुरुजी—ऐका. अगदीं थोडक्यांत सांगतों. अश्वपती या नांवाचा एक राजा होता. त्याची मुलगी सावित्री ती उपवर झाली तेव्हां तिला मनासारखा नवरा मिळेना. म्हणून बापाच्या आज्ञेनें तिनें सत्यवान् यास पसंत केलें. तो राजपुत्र सुशील आणि सद्गुणी होता. पण दारिद्र्यावस्थेंत होता; तरी तिनें आपल्या पित्यास त्याच्याशींच लग्न करून देण्यास सांगितलें, लग्नाची सिद्धता झाली. इतक्यांत नारद आले नि सत्यवान् अल्पायुषी आहे, असें म्हणाले. सावित्रीनें मीं त्याला मनानें वरिलें आहे, तो मग अल्पायुषी किंवा दीर्घायुषी कसाही असो असें स्पष्ट उत्तर दिलें. योग्य कालीं सत्यवानाशीं सावित्रीचा विवाह झाला. तिनें आपलें सर्व राज्यवैभव टाकिलें, पतीच्या स्थितीप्रमाणें ती साधीं वस्त्रें नेसूं लागली. आपला नवरा अल्पायुषी म्हणून ती दिवस मोजीत ईश्वरावर भरंवसा ठेवून काळ कंठीत होती. मृत्यूची वेळ जवळ आली म्हणून तिनें नवऱ्याजवळच राहाण्याचा निश्चय केला. नवरा अरण्यांत गेला. तो लाकूड तोडतां तोडतां धाडकन् जमिनीवर पडला नि प्राणास मुकला. स्वतः यमाची स्वारी पतीला नेण्यास आलेली पाहून ती त्याच्या मागोमाग धावली. सावित्रीचीं आणि यमाचीं पुष्कळ प्रश्नोत्तरें झालीं. सावित्रीनें यमाला आपल्या भाषणानें चकित केलें. यमानें एक दोन वर दिले. तरी सावित्री ऐकेना. शेवटीं पुत्रप्राप्तीचाही वर यमानें दिला. अर्थात् त्यानंतर यमाला पतीस जिवंत करावें लागलें. सत्य-

चान् पुन्हां जिवंत झाला आणि त्याचें गेलेलें राज्यही मिळालें. अशी ही थोडक्यांत कथा आहे.

**कृष्णा**—गुरुजी, आषाढ महिन्यांत कोणते सण आहेत?

**गुरुजी**—आषाढांत सर्व हिंदूंचा असा मोठा सण नाहीं. परंतु आषाढ शुद्ध एकदशीला महाएकादशी म्हणतात. ही महाएकादशी, कार्तिक शुद्ध एकादशी आणि माघ महिन्यांतील महाशिवरात्र हे तीन्ही दिवस सणांचे न म्हणता धार्मिक व्रतांचे आहेत, असें म्हटलें पाहिजे. ईश्वरभजन, ईश्वरपूजन, कीर्तन, उपवास असल्या गोष्टी या दिवशीं करावयाच्या असतात. बरें श्रावणांतला मोठा सण कोणता हें सांगाल कां कोणी?

**रामनाक**—आतांच मीं सांगितलें कीं नागपंचमी हा श्रावणांत मोठा सण असतो.

**गुरुजी**—होय. सांगितलें होतेंस खरें. नागपंचमी हा सर्व हिंदु स्त्रीपुरुषाचा मोठा सण आहे. आदले दिवशीं नागाप्रीत्यर्थ उपवास करावा. दुसरे दिवशीं कांडणें, दळणें, तव्यावर भाजणें, उकरणें हीं कामें बंद ठेवावयाची चाल आहे. नागपंचमीच्या दिवशीं पृथ्वीला आणि नागाला दुःख न होईल असें वर्तन ठेवावें. पुरण घालून त्याच्या पोळ्या न भाजतां दिंडे किंवा गाठोडीं वळून किंवा मोदक उकडून ते खाण्यांत येतात. स्त्रिया, मुलें हीं न्हाऊन माखून चांगलीं वस्त्रें घालून जिकडे तिकडे मिरवत असतात. झोंपाळ्यावर बसणें, गोफणीनें धोंडे लांब फेंकणें, खोबऱ्याच्या वाट्या फिरविणें, जिकावर बसणें, पाळण्यात बसणें, पळण्याच्या शर्यती लावणें असले विविध प्रकारचे खेळ खेळण्यात येतात. गांवातील एखाद्या प्रसिद्ध

देवालयाच्या आवारात सर्व जातीच्या स्त्रिया जमतात, फुगड्या, झिम्मा, पिंगा असले निरनिराळे खेळ खेळतात आणि फेर धरतात कोठें कोठें नागपचमी निमित्त मोठाल्या जत्रा भरतात. नागाला लाह्या, दूध, दूर्वा वाहण्यात येतात. घरोघरीं दोन प्रहरींच नागाची पूजा होते. तथापि सायकाळीं खरा नाग गावात कोणी आणला असेल तर पहावयास जाण्याची चाल आहे. आर्य लोकानीं नागाना चातुर्वर्ण्यात घेतलें तेव्हां पासून हा सण पडलेला असावा. पूर्वी आर्यांचें आणि नागाचें वरेच दिवस सरळ नव्हतें. जनमेजयानें या वाकडेपणा मुळेंच नागांचा सहार करण्याकरता प्रसिद्ध नागसत्र केलें वऱ्याच कालानतर नाग नि आर्य यांचा समेट झाला. श्रीकृष्णानेंही नागा-तला अनत मी आहें असें गीतेंत सागितलें आहे. नाग नि आर्य याच्या सख्याचा हा उत्सव आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. हिंदुस्थानातील सर्व भागात हा सण पाळला जातो. जगन्नियता नारायण शेपावर म्हणजे सर्पावर निजलेला आहे, हीहि गोष्ट आर्यांच्या आणि नागाच्या ऐक्याचीच खूण होय श्रावण महिन्यांत पूर्णिमेला नारळी पूर्णिमेचा मोठा उत्सव समुद्रकाठचे लोक समुद्राची पूजा करून करीत असतात. वाजत गाजत समुद्रावर जाऊन, पूजा करून आंत नारळ टाकण्याची प्राचीन चाल समुद्र कांठीं दृष्टीस पडते याच पूर्णिमेस राखीपूर्णिमा असें नाव असून उत्तर हिंदु-स्थानात राखी बाधण्याचा आणि हा सण पाळण्याचा मोठा प्रघात आहे. रामनवमी प्रमाणें श्रावणात एक मोठा उत्सव होत असतो. तो कोणता हें साग रे पुरुषोत्तम.

पुरुषोत्तम—गोकुळ अष्टमीचा उत्सव आमच्या घरीं होत

असतो. रात्रीं बारा वाजतपर्यंत आम्हाला केव्हा केव्हा तुळशी मोजीत बसावें लागतें.

गुरुजी—श्रावण वद्य अष्टमीस मध्यरात्रीं मथुरेंत ईश्वरानें वसुदेव देवकीच्या पोटीं जन्म घेतल्याची कथा आहे. भगवान् श्रीकृष्ण रात्रीं बारा वाजता जन्मास आले. म्हणून त्यावेळीं कीर्तनें, पुराणें, प्रवचनें हीं करण्यात येतात. ह्या अष्टमीला जन्माष्टमी म्हणतात त्या दिवशीं सर्व हिंदुस्थानभर उत्सव होतात. दिवसभर उपास करून दुसरे दिवशीं पारणें करावयाचें असतें. हा उत्सव धार्मिक स्वरूपाचा आहे. सर्व हिंदूमध्यें धार्मिक प्रेम उत्पन्न होण्याच्या दृष्टीनें हा उत्सव फार महत्त्वाचा आहे. उत्तर हिंदुस्थानात श्रीकृष्णलीला, श्रीरामलीला दाखविण्याची चाल आहे. सर्व हिंदूचें दैवत श्रीकृष्ण हें आहे. सर्व हिंदूचा धर्मग्रंथ जी गीता ती श्रीकृष्णानींच सांगितली. हरिविजयावरून तुम्हाला गोपाळकृष्णाच्या लीला माहीत होतील. गीतेवरून आणि भारतावरून भगवान् श्रीकृष्णाचा कर्मयोग तुम्ही प्रौढपणीं अवश्य समजून घ्या.

गंगू भाद्रपदातील मोठा सण गणपति बाप्पा मोरयाचाच ना?

गुरुजी—होय. श्रीगजाननोत्सवाला भाद्रपद शुद्ध चतुर्थीपासून प्रारंभ होतो. हा उत्सव दहा दिवसपर्यंतही असतो. या उत्सवाला सांप्रत धार्मिक, सामाजिक आणि राजकीय स्वरूप प्राप्त झालेलें आहे गणपतिउत्सव हा घरोघरीं होतो, श्रीमंताकडे होतो, शेटसावकाराकडे, जहागीरदाराकडे आणि गोरगरीब लोकाकडेही होतो. गणेशचतुर्थीच्या आदल्या दिवशीं हरितालिकेचें व्रत करीत असतात. सर्व हिंदु स्त्रियात ऐक्यभाव, प्रेमभाव उत्पन्न होण्याच्या दृष्टीनें वट-

सावित्रीच्या खालोखाल हरितालिका या व्रताची योग्यता आहे. निरनिराळ्या पुराणांमध्यें गणपतीचें वर्णन आहे. गणपतीचें आणि ओंकाराचें स्वरूप एकच आहे, असें लोक समजतात. गणपतीचें सिद्धिविनायक असें दुसरेंही नांव आहे. हिंदुस्थानांत बारा ज्योतिर्लिंगाप्रमाणें आठ सिद्धिविनायकही आहेत. गणपतीची पूजा करणारे गाणपत्यपंथी लोक हिंदुस्थानांत पुष्कळ आहेत. दर महिन्याच्या शुद्ध आणि वद्य चतुर्थीस गणपतीचे भक्त उपवास करीत असतात. गणपतीला दूर्वा नि मोदक आवडतात. वेदकालीं लहान लहान गणराज्यें हिमालयाच्या आसपास होतीं. सगळे गण आपल्यांतीलच एक मुख्य नेमून राज्यें चालवीत, त्या मुख्याला गणपती असें नांव मिळालें. याज्ञवल्क्य स्मृतीमध्यें गणपतीपूजा आली आहे. त्यापूर्वीच्या कोणत्याही ग्रंथांत ती नाहीं. हल्लीं श्रीगणेशोत्सवांत खाजगी नि सार्वजनिक रीत्या मंत्रजागर, कीर्तनें, पुराणें, प्रवचनें, व्याख्यानें हीं होतात. लोकजागृतीचें साधन म्हणून मेळ्यांचा प्रसार चांगला वाढत आहे. हा उत्सव घरोघरीं जुन्या तऱ्हेनें होतोच होतो; पण नवीन तऱ्हेनें सार्वजनिक पद्धतीचाही होतो. सण आणि उत्सव हीं दोन्हीं साधून धर्म नि राष्ट्र यांच्या कल्याणाचा हा सण आहे.

[illegible]—आश्विन महिन्यात दसऱ्याचा मोठा सण असतो ना!

[illegible]—होय. या महिन्यात नवरात्राचा उत्सव असतो. बहु-[illegible] इकडे देवीचीच नवरात्रें असतात. देवी भागवतांतील कथे-[illegible] देवी भवानीनें विजया दशमीचे दिवशीं महिषासुराला मारिलें, [illegible] हा उत्सव असतो असें म्हणतां येईल. दसऱ्याच्या सुमारास [illegible] संपलेला असतो. जिकडे तिकडे शेतें हिरवी गार दिसत

असतात, स्वाभाविकच प्रसन्नता वाटत असते. मराठे लोक पूर्वी दसऱ्याच्या सुमुहूर्तावरच त्यांच्या शिकाऱ्यांस निघत असत. रजपूत लोक, शीख लोक, फार काय पण सर्व हिंदु लोक बरसात संपल्यावर याच सुमुर्तावर लढाईला जात असत. दसरा हा साडेतीन मुहूर्तांपैकीं एक मुहूर्त आहे. हा सण धार्मिक राजकीय आणि सामाजिक स्वरूपाचा आहे. अद्यापिही दसऱ्याच्या दिवशीं सायंकाळीं मोठ्या थाटामाटानें सीमोल्लंघनाचा म्हणजे शींव ओलांडून जाण्याचा समारंभ होत असतो. गांवा बाहेर जाऊन शमीचें वा आपट्याचें पूजन करितात. शमी, आपट्याचीं पानें नि कोठें कोठें जोंधळ्यांच्या धाटाचीं पानें सुद्धां सोनें म्हणून एकमेकांनां देतात. एकमेकांच्या घरोघरीं जाऊन सोनें देण्याघेण्याची नि पानसुपारी देण्याची चाल आहे. सर्व हिंदूंना एकत्र करणारा असा हा सण आहे. सर्व हिंदु स्त्रियाही नवरात्रांत चांगला पोषाख करून देवदर्शनाला जातात आणि तेथें हळद कुंकू परस्परांना देतात. मुलेंही दसऱ्याचा दिवस आनंदानें घालवितात असा हा उत्तम सण आहे. बरें दिवाळीचा सण कधीं येतो तें घ्यानांत आहे काय?

कृष्णा—दिवाळीचा सण आश्विनांत नि कार्तिकांत येतो हें पाठाच्या प्रारंभींच मीं सांगितलें आहे.

गुरुजी—ठीक आहे तुझी स्मरणशक्ति. आश्विन वद्य त्रयोदशीस धनत्रयोदशी म्हणतात; आणि वद्य चतुर्दशीस नरक चतुर्दशी असें नांव आहे. नरकासुर या नांवाच्या बलाढ्य राक्षसाला श्रीकृष्णानें ठार केलें तेव्हां पासून या सणाचा प्रसार पडला. अमावास्येस सायंकाळीं लक्ष्मी पूजनाचा समारंभ होतो आणि व्यापारी वर्षाचे

हिशेब पुरे करितात. कार्तिक शुद्ध प्रतिपदा हा विक्रम सवताचा पहिला दिवस असून व्यापाऱ्यांचे नवे हिशेबठिशेब याच दिवसापासून सुरू होतात. जमाखर्चाच्या वह्यावर स्वस्तिक काढून त्या पूजण्यांत येतात. सायकाळीं पान सुपारी नि दिवानचीची रोषनाई करण्यात येते. कार्तिक शुद्ध प्रतिपदेस बलिप्रतिपदा असेंही नाव आहे. वामनानें बलीचें राज्य घतल्यावर त्याचें नाव राहावें म्हणून कार्तिक शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं आनदोत्सव करण्याचा बलीला वर दिला तेव्हा पासून हा सण प्रचारांत आला बलिप्रतिपदा साडे तीन मुहूर्तांतला एक मुहूर्त होय. द्वितीयेला यमद्वितीया किंवा भाऊ बीज म्हणतात. यमानें आपली बहीण यमी इच्या घरीं या दिवशीं भोजन केलें. त्याप्रमाणें हल्लींही भाऊ बहिणीच्या घरीं भोजनास जाता बहीण भावाला ओवाळते आणि पक्वान्न खाऊ घालते भाऊ बहिणीला ओवाळणी घालतो. दिवाळीचा सण केव्हा तीन दिवसाचा केव्हा चार दिवसाचा असतो. त्या मानानें लक्ष्मी पूजनही मागें पुढें होतें सर्व हिंदु लोकात आणि व्यापाऱ्यात कार्तिक शुद्ध प्रतिपदेचें महत्त्व अधिक आहे या दिवसाला दिवाळीचा पाडवा म्हणतात दिपवाळीच्या दिवसात मिष्टान्नभोजन, फराळाचे निरनिराळे पदार्थ खाणें, दारू उडविणें, रोषनाई करणें दीपोत्सव करणें, अगाला सुवासिक अत्तरें तेलें लावणें, नवीं वस्त्रें घेणें, अलकार घालणें, सोंगट्या खेळणें, गंजिफा किंवा पत्ते खेळणें या गाष्टी या चार दिवसाच्या सणांत एक सारख्या चाललेल्या असतात. मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला देवाची दिवाळी किंवा मोठी दिवाळी म्हणतात. रस, वडे नि पक्वान्नें करून देवाला नैवेद्य

दाखवितात. पौष महिन्यांत संक्रांतीचा मोठा 'सण असतो. सूर्य मकर राशींत गेला म्हणजे उत्तरायणास प्रारंभ होतो. सूर्याच्या गतींत बदल म्हणजे संक्रमण किंवा संक्राति होतें. संक्रांतीचा सण सर्व हिंदु स्त्रीपुरुषांचा असतो. त्याच्या आदल्या दिवशीं भोगी नि दुसऱ्या दिवशीं किंक्रांत करितात. संक्रांतीच्या दिवशीं पर्वकाळीं तीळ लावून स्नान करणें, तिळगूळ दान करणें, संध्याकाळीं तिळगूळ एकमेकांस वांटणें या मुख्य गोष्टी असतात. सर्व हिंदु समाजात संक्रांतीच्या दिवशीं पुरुषांनीं नि स्त्रियांनीं तिळगूळ वांटण्याची आणि किंक्रांतीच्या दिवशीं स्त्रियांनीं हळदीकुंकू करून तिळगूळ देण्याची चाल सर्वांत उत्तम आहे. हिंदु समाजाचें ऐक्य वाढविणारा असा हा सण आहे. माघ व फाल्गुन महिन्यांतले सण तर तुम्हाला ठाऊक असले पाहिजेतच.

अमृतलाल—फाल्गुनातील सण माहीत आहे. माघांतला सण मात्र माहीत नाहीं.

गुरुजी—माघांत तसा सण नाहीं, फक्त एक शिवरात्र असते. पण ती सुद्धां सण नसून शंकरभक्तांचा तो एक दिवस आहे. या दिवशीं एकादशी प्रमाणें उपवास आणि ईश्वरभजन, पूजन, कीर्तन हीं करावयाचीं असतात. फाल्गुनांत पूर्णिमेला होळीचा सण असतो. दोन प्रहरीं किंवा सायंकाळीं पांच शेणींची होळी करून पूजा करून नैवेद्य दाखविणें एवढेंच धार्मिक कृत्य या सणामध्यें करावयाचें असतें आणि तें शंकरानें आपल्या तिसऱ्या डोळ्यांतील अग्नीनें मदन जाळण्याची खूण म्हणून करावयाचें असतें. आट्यापाट्या, खो-खो इत्यादि खेळ ह्या शिमग्याच्या दिवसांत करावे. बाकी सर्व असभ्य प्रकार बंदच केले पाहिजेत.

संतोवा—बारा महिन्यांतील मुख्य मुख्य सणांची माहिती संपली काय?

गुरुजी—मुख्य सणांची ढोबळ माहिती मी तुम्हांला दिली आहे. तीवरून कांहीं सण देवाकरितां, कांहीं ऋषी करितां, कांहीं पितरांकरितां आणि कांहीं समाजा करितां आहेत हें तुमच्या लक्षांत आलेंच असेल. देव, ऋषी, पितर आणि समाज यांच्या प्रीत्यर्थ हे सण पाळले पाहिजेत.

पुरुषोत्तम—सणांची माहिती, महत्त्व नि उद्देश आम्हांला समजले. आम्ही त्या प्रमाणें वागण्याचा प्रयत्न करूं.

गुरुजी—मुलांनो, आजचा सणांच्या माहितीचा पाठ संपला.

---

## पाठ सतरावा.

### शेवटचा उपदेश.

गुरुजी—मुलांनो, पूर्वी गुरुगृहांतून विद्यार्थी विद्या संपवून घरीं जाऊं लागला म्हणजे त्याला गुरु जो उपदेश करीत असत तो मी तुम्हांला सांगतों.

शान्तशील—सांगा, सांगा.

गुरुजी—विद्या पूर्ण झाल्यावर शिष्याला आचार्य पुढीलप्रमाणें उपदेश करीतः—सत्यंवद । धर्मंचर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातंतुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यम् । कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदि-

तव्यम् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् । देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यनवद्यानि कर्माणि । तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यान्यस्माकँ सुचरितानि । तानि त्वयोपास्यानि । नो इतराणि । ये के चास्मच्छ्रेयाँसो ब्राह्मणाः । तेषां त्वयाऽऽसनेन प्रश्वसितव्यम् । श्रद्धया देयम् । अश्रद्धया ऽ देयम् । श्रिया देयम् । ह्रिया देयम् । भिया देयम् । संविदा देयम् । अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् । ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः । युक्ता आयुक्ता । अलूक्षा धर्मकामा.स्यु । यथा ते वर्तेरन् । तथा ते तत्र वर्तेथा

**भावार्थ**—खरें बोल. धर्माप्रमाणें वाग. अभ्यास करण्यास चुकूं नकोस. विद्या पुरी झाल्यावर आचार्याला प्रिय असें धन देऊन गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर. खरें बोलण्यास विसरूं नकोस. धर्माप्रमाणें वागण्यास चुकूं नकोस. आपलें कल्याण व्हावें म्हणून कर्तव्यें करण्याची टाळाटाळ करूं नकोस. उत्कर्षकारक कामें करण्यास चुकूं नकोस. स्वतःचा अभ्यास करणें आणि कोणी शिकवा म्हटल्यास जें येतें तें सांगणें हें कर्तव्य करण्यास चुकूं नकोस. देवकार्य आणि पितृकार्य ह्याविषयीं नेहमीं दक्ष रहा. मातेला देव समज. पित्याला देव मान. आचार्याला देवाप्रमाणें समज. अतिथीला देवाप्रमाणें समज. जीं कर्में निंद्य नाहींत, त्याचेंच आचरण करावें इतर कर्माचें करूं नये. जीं आमचीं सत्कर्में असतील त्यांचेंच त्वां आचरण करावें; इतर कर्मांचें आचरण करूं नये. जे श्रेष्ठ विद्वान् असतील त्यांना आसन देऊन त्यांच्या श्रमाचा परिहार

करावा. जें कांहीं द्यावयाचें तें श्रद्धेनें द्यावें, अश्रद्धेनें देऊं नये. मर्यादायुक्त होऊन द्यावें. भीतियुक्त होऊन द्यावें. ओळख करून मग द्यावें. याशिवाय कोणत्याही बिकट प्रसंगीं वर्तन कसें ठेवावें याविषयीं तुला संशय आल्यास, विद्वान् निस्पृह, सुशील सदाचार संपन्न अशाचा विचार घेऊन वाग.

कृष्णा—हा प्राचीन काळचा उपदेश फारच चांगला आहे.

गुरुजी—मी आता पर्यंत हाच उपदेश डोळ्यापुढें ठेवून तुम्हांला तुमचीं कर्तव्यें सांगितलीं. आतां पुन्हा एकदा या उपदेशानुसार पूर्वी सांगितलेल्या गोष्टी पडताळून पाहूं या. गोविंदा तो फळ्यावर लिहिलेला अर्थ वाच पाहूं

गोविंदा—खरें बोल, धर्माप्रमाणें वाग, सत्य बोलण्यास चुकूं नकोस असें येथें पहिल्यानें लिहिलें आहे.

गुरुजी—सत्याची महती काय आहे, सत्य कां बोलावें, खरें बोलून अजरामर कीर्ति ठेवून कोणकोण गेले हें मी तुम्हास पहिल्या पुस्तकांत सांगितलें आहे. * तसेंच धर्म हा सर्व जगाला कसा आधारभूत आहे आणि धर्माचरण कां केलें पाहिजे हा विषयही तुमच्या लक्षांत असेलच.

चंपावती—होय, तें सर्व लक्षांत आहे.

गुरुजी—तुमचें कल्याण ज्यांत आहे, उत्कर्ष ज्यांत आहे, अशीं कर्में करण्यास विसरूं नका. असें पुढें म्हटलें आहे. आतां पर्यंत सांगितलेल्या सर्व गोष्टी तुमच्या कल्याणाच्याच आहेत. तुम्ही तुमचें कल्याण करण्यास शिकला कीं कुटुंबाचें कल्याण, समाजाचें

* हिंदुधर्मशिक्षण पुस्तक पहिलें, पाठ तेरावा.

कल्याण, देशाचें कल्याण, कसें करावें हें तुम्हाला आपोआप समजेल. ईशस्तवन, शौचधर्म, अभ्यास, शिष्टाचार आणि शील यांचें केलेलें विवेचन लक्षांत घ्या आणि त्याप्रमाणें वागा. रामनाक पुढें वाच पाहूं.

**रामनाक**—आईला देव समज, बापाला देव समज, गुरुला देव समज आणि अतिथीला देव समज असें लिहिलेलें आहे. त्यांत अतिथीला देव समज याचा अर्थ कांहीं समजला नाहीं.

**गुरुजी**—आई, बाप नि गुरु यांच्याविषयीं मी तुम्हांला पुष्कळ सांगितलें आहे. अतिथीविषयीं सांगितलें नाहीं. म्हणून आतां थोडेसें सांगतों. अतिथि म्हणजे पाहुणा. एका तिथीपेक्षां ज्यास्त दिवस जो रहात नाहीं त्याला अतिथि म्हणतात. प्राचीनकाळीं गृहस्थ लोक भोजनाचे वेळीं अतिथींची वाट पाहत असत. मोठमोठे ऋषी, तपस्वी, ज्ञानी, मुनी, हे समाजकार्य आणि धर्मकार्य करण्याकरितां इकडून तिकडे जात येत असत. भोजनाची सोय या अतीथिधर्मानें होत असे. हल्लींही विद्वान् कार्यकर्ते, पुढारी असे पाहुणे आपल्या घरीं आले तर त्यांची नीट व्यवस्था ठेवावी. स्वयंसेवक होऊन त्यांचीं लहान मोठीं जीं पडतील तीं कामें करावीं. हल्लीं अतीथींची सेवा करण्याचे प्रसंग निरनिराळ्या परिषदांचे वेळीं येतात. धार्मिक, सामाजिक, राजकीय परिषदांच्या वेळीं तुम्ही सर्वांनीं स्वयंसेवक दलांत जावें, तेथें आज्ञाधारकपणानें वागावें. जें काम उत्तम करितां येईल तेंच करावें. बालचरांची चळवळही समाजसेवेकरितां आहे. आप्त, इष्ट, सोयरे, धायरे, ऋणानुबंधी असे पाहुणे प्रत्येकाच्या घरीं येत असतात तेव्हां त्यांची ही योग्य व्यवस्था ठेवावी. इतकाच ' अतीथीला देव समज ' या वाक्याचा अर्थ आहे.

गोपाळ—जीं कर्में निंद्य नाहींत, जीं आमचीं कर्में वाईट नाहींत त्यांचेच तू आचरण कर असें गुरु काय म्हणून सांगत आहेत ?

गुरुजी—गुरु, आचार्य, शिक्षक म्हणजे कांहीं ईश्वर नव्हेत वा सर्वज्ञ नव्हेत. सर्वगुणसंपन्न असा गुरु असता तर त्यानें कधींही असें म्हटलें नसतें. परंतु गुरु झाला तरी मनुष्यच. मनुष्य म्हटला कीं त्याच्या ठिकाणीं कांहीं सद्गुण नि कांहीं दुर्गुण असतातच. गुरु किंवा आचार्य झाला तरी त्याला लहानपणापासून जें वळण लागलेलें असतें तसाच तो वागतो त्यालाही कांहीं वाईट सवयी असल्या, त्याचे ठिकाणीं कांहीं दुर्गुण असले तर ते शिष्याला लागू नयेत म्हणून गुरु काळजीनें शिष्याला सांगत आहे कीं, " बाबा, माझ्या सहवासांत तू इतके दिवस आहेस. माझ्याजवळ सर्वच गोष्टी चांगल्या आहेत किंवा वाईट आहेत असें नाहीं. तथापि माझ्यापासून तुला वाईट गोष्टी, दुर्गुण, दुष्ट सवयी लागू नयेत म्हणून मी तुला बजावतों कीं तुझ्या बुद्धीला ज्या गोष्टी चांगल्या वाटतील, जो आचार तुला चांगला वाटेल त्याचेंच तू अनुसरण कर. गुरूला सुपारी खाण्याची, विडी ओढण्याची, चहा पिण्याची सवय असेल तर ती शिष्यानें कधींही घेऊं नये. गुणाजवळून काय घ्यावें हें ज्याचें त्यानें स्वातंत्र्यानें ठरवावें असा गुरूच्या सांगण्याचा आशय आहे. समजलें का मुलांनो ?

मुलें—होय समजलें

गुरुजी—पुढें विद्वानांशीं कसें वागावें, त्यांच्या श्रमाचा परिहार कसा करावा हें सांगितलें आहे. विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं विनय असला

पाहिजे, मर्यादा असली पाहिजे, भीति असली पाहिजे, आदर असला पाहिजे. जें द्यावयाचें तें त्यांनीं श्रद्धेनें द्यावें, विनयानें द्यावें, मनापासून द्यावें, कुणाच्या भिडेखातर, कोणी कांहीं म्हणेल म्हणून मनात नसताना विद्या, द्रव्य किंवा कोणताही पदार्थ देऊं नये. मनुष्यानें सदोदित स्वतंत्र विचार करून वागावें असा त्या उपदेशातील आशय आहे. व्यवहारात अनेक भानगडीचे प्रसग येतात. त्या सर्व प्रसगीं कसें वागावें हें तुम्हाला समजलें काय?

गंगू—पुष्कळ वेळा समजत नाहीं नि काहीं सुचत नाहीं. तेव्हा मी मग आईला विचारीत असते.

गुरुजी—पुष्कळ प्रसग असे असतात किंवा पुष्कळ कार्यें अशीं असतात कीं, आईबाप किंवा गुरुजी यानाही त्यातील काहीं समजत नाहीं. अशा वेळीं त्या कार्याचा विचार ज्यानें केला आहे त्याचीच गाठ घेणें उचीत असते. दुखणें आलें कीं वैद्याच्या विचारानें वागावें, कायद्याची आवश्यकता असेल तर वकिलाला विचारावें, अभ्यासात नडलें तर गुरुजीला विचारावें. धर्मशास्त्राचा प्रश्न असेल तर धर्म शास्त्री किंवा पडित याना विचारावें. साराश निरनिराळ्या व्यवहारांत तज्ञाच्या, विद्वानाच्या, निस्पृहाच्या संमतीनें वागावें अशी हिंदुधर्माची आज्ञा आहे.

पुरुषोत्तम—धर्मामध्यें विद्यार्थ्यांना उद्देशून सागितलेलीं कर्तव्यें संपलीं काय?

गुरुजी—बहुतेक सर्व सपली. वेदकाळ आणि सांप्रतचा काळ यांच्यामध्यें पुष्कळ अंतर आहे, म्हणून आजच्या काळाला अनुस-

रून पूर्वीचीं तत्त्वें न सोडतां ब्रह्मचर्याश्रमांतील कर्तव्यें हीं एक प्रकारची तपश्चर्या समजून तुम्ही तीं सर्व केलीं पाहिजेत.

कृष्णा—तपश्चर्या म्हणजे काय?

गुरुजी—तप् या धातूचा अर्थ तापणें असा आहे. तप म्हणजे बारा वर्षे असा दुसराही अर्थ आहे. कोणतेंही काम उत्तम करावयास मनुष्याला श्रम करावे लागतात. कार्याकरिता दीर्घ श्रम म्हणजे तप आणि तें तप पुष्कळ दिवस चिकाटीनें करीत राहाणें याचें नांव तपश्चर्या.

गोविंद—आम्ही कसली तपश्चर्या करावी?

गुरुजी—तुमची तपश्चर्या म्हणजे आतां पर्यंत सांगितलेलीं कर्तव्यें. तुम्हाला मी आतांपर्यंत ईश्वरविषयक, वडिलासंबंधी, आईबापासंबंधी, शरीरबल, बुद्धिबल याविषयीं, स्वच्छतेविषयीं, शीलाविषयीं, ब्रह्मचर्याबद्दल, अन्नाबद्दल, पावित्र्याबद्दल, सणाबद्दल म्हणून जें जें कांहीं सांगितलें तें तें तुम्ही बिनचूक करावें. कोणतीही चांगली गोष्ट पुष्कळ दिवस करीत राहिल्यानें मनुष्याची तपश्चर्या वाढते आणि त्याला अधिकार येतो. चांगल्या कार्यासंबंधीं अखंड प्रयत्न करीत राहाणें, चिकाटीनें हितकर गोष्टीच्या मागें लागणें याचेंच नाव तपश्चर्या. तुम्ही प्रात:स्मरण, स्नान, संध्या, नमस्कार, ईशस्तवन, गीतापाठ, स्तोत्रें हीं रोजचीं धर्मकर्में आणि वरील कर्तव्यें निष्ठेनें करा म्हणजे ईश्वर तुमच्यावर प्रसन्न होईल.

---

## पाठ अठरावा.

### निवडक वेंचे.

#### श्रीरामदास.

वन्हीं तो चेतवावा रे। चेतवितांच चेततो। विवेक जाणिजे तैसा। वाढवितांच वाढतो ॥१॥ संग तो साक्षपी याचा। धरितां साक्षपु घडे। साक्षपें साक्षपु वाढे। पुरती मनकामना ॥ २ ॥ कष्टतां सौख्य मानावें। कष्टीं फळाचि पाविजे। आळसें सुख वाटें तें। दुःखब्रह्मांड भोगवी ॥ ३ ॥ केल्यानें होत आहे रे। आधीं केलेंचि पाहिजे। येत्न तो देव जाणावा। अंतरीं धरितां बरें ॥ ४ ॥ आचुक येत्न तो देवो। चुकणें दैत्य जाणिजे। न्याय तो देव जाणावा। अन्याय राक्षसी क्रिया ॥ ५ ॥ सावधु देव जाणावा। उन्मत्तु दैत्य बोलिजे। होरव्या दैत्य जाणावा। देव तो सौख्यदायकु ॥ ६ ॥ साक्षपी अंश देवाचें। आळसी वौंश दानवी। राक्षसी दैत्य तो मोठा। अन्यायें दैत्य जाहाला ॥ ७ ॥ देव सर्वांस सांभाळी। तदाश जाणिजे तसा। दैत्य ते पीडिती लोकां। तदांश त्याच सारिखे ॥ ८ ॥ दंभ-दर्प साभिमानें। कर्कशें वचनें मुखीं। कोपी ते दैत्य जाणावे। निष्ठुर पर घातकीं ॥ ९ ॥

यत्नाचा लोक भाग्याचा। यत्नेवीण दरिद्रता। उमजला लोक तो धाला। उमजेना तो हपापिला॥ १ ॥ हिंडता शाहाणें होतें। बोलतां बोल सीकतें। वाचितां लिहितां येतें। तेणें तें मान्य होतसें॥२॥ घरींच [illegible]

कष्टला म्हणिजे वरा ॥ ३ ॥ मुकाळू म्हणिजे खोटा । धीराचा पाहिजे नर । तार्किक असावा प्राणी । सावधान चहूंकडे ॥ ४ ॥ प्रसगें वर्तता आलें । यथातथ्यचि सूचिलें । मनुष्य राखिलें राजी । तो प्राणी शाहाणा वरा ॥ ५ ॥ सर्वई धीर सांडीना । यत्नीं यत्न वरा करी । हिंडता पारखी लोका । कार्यकर्ता जिवीं धरी ॥ ६ ॥ मैत्रिकीही विटों नेदी । सर्वांसी सारिखा दिसे । विचार जाणतो मोठा । दक्ष तो जाणता जनीं ॥ ७ ॥ उदंड बोळखी होता । उदंड भाग्य होतसे । उदंड कळहो होता । उदंड लाय खातसे ॥ ८ ॥ विचारें गोड बोलावें । बहुता मान्यसें वरें । भाडता पुरे नाकीं । मैत्रिकी करिता वरें ॥ ९ ॥ बोलावें उसीणें घ्यावें । वर्तता उसीणें निघे । कुटिता कुटिती लोक । वोढता वोढतीं जनीं ॥ १० ॥ करावें तेची पावावें । हें आलें आपणाकडे । आपलें आपणापासीं । जनासीं काय बोल हा ॥ ११ ॥ आपला मित्र कीं शत्रु । जसें करि तसें घडे । दिसते गोष्टी ते ऐसी । पडती पडिली पाहा ॥ १२ ॥

## श्रीतुकाराम.

दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा ॥ १ ॥ आतां मज ऐसें करी । तुझे पाय चित्तीं धरीं ॥ २ ॥ उपजला भाव । तुमचें कृपें सिद्धी जावो ॥ ३ ॥ तुका म्हणे आता । लाम नाहीं यापरता ॥ ४ ॥

माझे मन कळें येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ १ ॥ आतां आड उभा राहें नारायणा । दयासिंधुपणा साच करी ॥ २ ॥ वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रिया आधीन झालों देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझा जैसातैसा दास । न धरी उदास मायबापा ॥ ४

अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥ १ ॥
वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयता कुळयाती ॥ २ ॥
ऐसा हा निवाडा झालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरची ॥३॥
तुका म्हणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी॥४॥

परपीडक तो आम्हा दावेदार । विश्वीं विश्वंभर म्हणऊनि ॥ १ ॥
देईं त्यागूं बळें नावलेकूं डोळां । राखूं तो चांडाळा ऐसा दुरी ॥२॥
अनाचार कांहीं न साहे अवगुण । बहु होय मन कासावीस ॥३॥
तुका म्हणे माझी एकविध सेवा । विमुख ते देवा वाळी चित्तें ॥४॥

चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥१॥
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गोड ॥२॥
तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहातां अवगुण मिळेचिना ॥३॥

ब्राह्मण तो याति अंत्यज असतां । मानावा तत्वता निश्चयेसी ॥१ ॥
रामकृष्ण नामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥ २ ॥
शांतिक्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ ३ ॥
तुका म्हणे गेल्या षडऊर्मी अंगें । सांडुनिया मग ब्रह्मचि तो ॥४॥

## जीवित महिमा.

### ( फटका )

'असार जीवित ! केवळ माया !' रडगाणें हें गाउं नका ॥ घेई झोंपा तो नर मेला संशय याचा धरूं नका ॥ ध्रु० ॥ वरूनि दिसते स्थिती न तैशी आत सत्वता पूर्ण असे ॥ तथ्यपूर्ण संसार खरा हा मन लावुनिया जगा कसे ॥ १ ॥ "मेलों म्हणजे मिळ-विलि ! झालें सार्थक" माना मनिं न असे ॥ "मातिच तूं बा,

## करुणाष्टक.

अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया ॥ परमदिनदयाळा नीरसीं मोह माया ॥ अचपळ मन माझें नावरे आवरीतां । तुजविण शिण होतो धांवरे धांव आतां ॥ १ ॥ भजनरहित रामा सर्वही जन्म गेला। स्व–जन–जन–धनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला ॥ रघु–पति मति माझी आपुलीशी करावी ॥ सकळ त्यजुनि भावें कांस तुझी धरावी॥२। विषय–जनित सूखें सूख होणार नाहीं ॥ तुजविण रघुनाथा वोखटें सर्व कांहीं॥ रघु–कुळ टिळका रे हीत माझें करावें। दुरित दुरि रहावें म्या स्व–रूपीं भरावें ॥ ३ ॥ तनमनधन माझें राघवा रूप तूझें । तुजविण मज वाटे सर्व संसार वोझें ॥ प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी। अचळ भजन लीला लागली आस तूझी॥ ४। चपळपण मनाचें मोडितां मोडवेना ॥ सकळ स्वजन माया तोडितां तोडवेना॥ घडिघडि विघडे हा निश्चयो अंतरींचा ॥ म्हणवुनि करुणा हे बोलतो दीन वाचा ॥ ५ ॥ जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी ॥ मज वरि करुणेचा राघवा पूर लोटी ॥ तळमळ निववी राम कारुण्यसिंधू ॥ षड्रिपु कुळ माझें तोडि यांचा समंधू ॥ ६ तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी ॥ शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तुझी ॥ झडकरि झड घालीं धांव पंचाननारे ॥ तुजविण मज नेती जंबुकी वासनारे ॥ ७ ॥ स्वजनजन धनाचा कोण संतोष आहे॥ रघुपतिविण चित्त आतां कोठें न राहे ॥ जिवलग जिवलग घेती प्रेत सोडोनि देती ॥ विषय सकळ नेती मागुता जन्म देती ॥८।

समाप्त.

मार्तित मिळशी!" आत्म्याला हें वचन नसे ॥ २ ॥ सुखदु:खा भोग भागणें ह्या मुळिं जीवितहेतु नसे ॥ आता पेक्षां उद्या काां तरी सराल पुढतीं करा असें ॥ ३ ॥ अपार विद्या काळ अल्प झरझर कैसा धावतसे ॥ मोठी छाती, परि दर ठोका मृत्यु जवळ सुचवितसे ॥ ४ ॥ अफाट ऐशा निश्वरणागणिं चकमक ससाराचे असे ॥ तींत व्ढोनी वहुधीरानें नाव गाजवा शूर असें ॥ ५ ॥ (चाल) मुर्दी निचारी कुणिहि हका ॥ अशीं मेंढरें वनू नका ॥ गेल्या गोष्टी स्मरू नका ॥ गत काळाचा शोक पुरा ॥ पुढचा भासो कितिहि सुखाचा काळ भरसा धरू नका ॥ 'असार जीवित केवळ माया!' रडगाणें हें गाउ नका ॥ जाते घडिही अपुली साधा करा कार्यतें आता करा ॥ चित्तामध्यें धैर्य धरारे हरिवरि ठेवा भाव पुरा ॥ १ ॥ थोर महात्मे होउन गेले चरित्र त्यांचें पहा जरा ॥ आपण त्याच्या समान होऊं हाच सांपडे बोध खरा ॥ २ ॥ जग हें त्यजितां भवसागरिच्या वाळवटिवर तरी जरा ॥ चार पाउलें उमटवु आपुलीं ठवु सुणेचा मार्ग बरा ॥ ३ ॥ संसाराचा सागर, दुस्तर त्यातुन जाण्या पैलतिरा ॥ खटपट करितां गोत खाता निराश होउनि जाय पुरा ॥ ४ ॥ अशा नराच्या दृष्टिस पडतां आपुलिं पाऊलें जराजरा ॥ काणि म्हणावें नाहिं म्हणोनी येईल त्याला धीर बरा ॥ ५ ॥ (चाल) उठा उठा तर निजूं नका ॥ "होईल कैसे!" म्हणू नका ॥ यशाहि निम्ना भिऊ नका ॥ दीर्घोद्योगा सोडू नका ॥ "धीरधरी तो गंभीर" असें शिका शिकारे विसरू नका ॥ 'असार जीवित केवळ माया!' रडगाणें हें गाऊ नका ॥

## निवडक पदें.

भज भज भज जलधि माजि मनुजा शिवाला ॥ ध्रु० ॥ धरिशेल दृढ चरणकमल, घडिभरितरि करुनि विमल ॥ तरिच सकल ापशमल, त्यजरे भवाला ॥ भज भज ॥ सांडुनिया विषय–वमन, ाडकरि करि पडरि दमन ॥ पूजिं मन हें करुनि सुमन, ॥ गिरिजा ावाला ॥ भज भज ॥ १ ॥ सावध हो करिशि काय शंकर गुरुबाप ाय ॥ चिंतुनि कविराम पाय हृदयीं निवाला ॥ भज भज भव-जलधि २

### पद.

नेदी चित्ता शांति ऐशी विद्या काशाला ॥ नेघे हरिचें नाम ऐशी जिव्हा काशाला ॥ध्रु०॥ अप्रिय बोलति पतिला ऐशी बाइल काशाला ॥ वाइलिला जो व्यर्थ गाजितो तो पति काशाला ॥ हृदयीं कृत्रिम अशाशीं ती मैत्री काशाला ॥ मनचा खोटा फिरोनि शिणला तीर्थें काशाला ॥ नेदी ॥१॥ भाव विरहित नर जो त्याला दैवत काशाला एकभड ना भराभर त्या विंध्या काशाला ॥ एक गुणींना दुर्गुणे बेटे शंभर काशाला ॥ आदर न करी त्याच्या घरचें भोजन काशाला ॥ नेदी ॥ २ ॥ गर्वें ताठुनि जाय तयाशीं भापण काशाला ॥ अभाग्याचें समर्थाशीं वैर काशाला ॥ करणी नसता ज्ञान व्यर्थ बडबड काशाला ॥ हृदयीं षड्रिपु नसती त्याला जप–तप काशाला ॥ नेदी ॥ ॥ ३ ॥ गुरुपदि निष्ठा न धरी ऐसा शिष्य काशाला ॥ शिष्याला जो वाइट चिंती तो गुरु काशाला ॥ बाधा अथवा भेद्या ऐसा सेनक काशाला ॥ प्रबोध निर्मळ न करी ऐसा स्वामी काशाला ॥ नेदी ॥ ४ ॥ प्रीत धरीना सहोदराची ऐसा सोदर काशाला ॥ पोट भरेना जेथें ऐसा देश काशाला ॥ हरि–कवि बोले सद्गुरु–वचनीं संसृति पाशाला ॥ नेदी चित्ता शांति ऐशी विद्या काशाला ॥ ५ ॥